


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# <u>निवेदन</u>

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १२ वें ] एप्रिल १९५९ [ अंक ७



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

वर्ष बारावें
अंक सातवा

# नवभारत

एप्रिल
१९५९

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( द. सातारा )

अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'नवभारत' मासिक, एप्रिल १९५९

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे.—का. सं. ]

**प्रा. म. शं. वाबगांवकर :** नागपूर येथील मराठीचे प्राध्यापक; कवि व लेखक

**प्रा. ग. मो. पाटील :** मुंबई येथील इस्माइल युसुफ कॉलेजांतील संस्कृतचे प्राध्यापक; भाषाशास्त्र-विषयक विशेष अध्ययन.

**श्री. प्रभाकर पुजारी :** सोलापूर येथें अध्यापन; नवभारत व अन्य नियतकालिकांतून स्फुट लेखन.

**श्री. सत्यबाला तायल :** पंजाबमधील सामाजिक व सर्वोदय कार्यकर्त्या; सांप्रत नागपूर येथें मातृसेवासंघांत सामाजिक कार्य.

**श्री. मंदाकिनी आचार्य :** नाशिक जिल्ह्यांतील सर्वोदय आंदोलनांतील कार्यकर्त्या.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म. म. डॉ. वा. वि. मिराशी

# रामगिरि विदर्भांत स्थिर आहे

बदलापुरचे सुविख्यात ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध संशोधक श्री. ना. गो. चापेकर यांनी 'नवभारता' च्या गेल्या मार्चच्या अंकांत 'रामगिरि अद्यापि ढगांतच' या शीर्षकाचा लेख लिहिला आहे. त्यांत कविकुलगुरु कालिदासाने मेघदूतांत उल्लेखिलेला रामगिरि हा मध्यप्रदेशांतील पूर्वीच्या सरगुजा संस्थानांतील रामगड पर्वत होय या श्री. वा. कृ. परांजपे यांच्या मताचें, आणि तो विदर्भांतील रामटेक होय या आमच्या मताचें परीक्षण करून 'रामटेक मनांत भरत नाहीं आणि रामगड बुद्धीला पटत नाहीं' असा निष्कर्ष काढला आहे. 'मुरारेस्तृतीय: पन्था:' या न्यायाने 'रामगिरि माळव्यांत स्थापणें शक्य आहे' असें ते एका ठिकाणीं म्हणतात तर इतरत्र "गोदावरी कांठच्या पंचवटीच्या आसपास, मग ती पश्चिमेस असो अथवा पूर्वेस असो, रामगिरीचा शोध करणें युक्त होईल" असेंहि आपलें मत व्यक्त करतात तेव्हां 'रामगिरीच्या स्थानाविषयीं' त्यांच्या मनाची दोलाचलवृत्ति झालेली दिसते. शेवटीं ते 'रामगिरि अद्यापि ढगांतून बाहेर पडला नाहीं असें दिसतें' असा निर्णय जाहीर करतात. श्री. चापेकरांनीं दीर्घकाल न्यायदानाचें कार्य केलें आहे. या कार्यांत दोन्ही बाजूंचा पुरावा पारखून निर्णय द्यावा लागतो. पुराव्याची छाननी करतांना प्रथमपासून मन संशयग्रस्त ठेवावें. शेवटीं एखाद्या पक्षाविरुद्ध थोडाहि संशय उत्पन्न करणारी एखादी गोष्ट आढळल्यास तो पक्ष सिद्ध झाला नाहीं असा निर्णय द्यावासा वाटतो. रामगिरिविषयक मतांची परीक्षा करतांना श्री. नानासाहेब चापेकरांचें मत असेंच शंकेखोर झालें आहे. त्यांनी अनेक शंका काढल्या आहेत. उदाहरणार्थ खालील शंका पाहा— (१) 'जनकतनयास्नानपुण्योदकेषु' यांतील जनकाची मुलगी म्हणजे सीता कशावरून? ' (२) 'रघुपतिपदैरङ्कितं मेखलासु' येथें रामचन्द्राच्या ऐवजीं 'रघुपति' असा संदिग्ध शब्द कालिदासाने कां वापरला? (३) रेवा म्हणजे नर्मदा कशावरून? एका नदीला दोन नांवें कां? अशीं दुसरीं कितीं उदाहरणें सांपडतील? (४) 'रामगिरिस्वामिन: पादमूलात्' यांतील स्वामी विष्णूच का समजावयाचा? रामगिरि नांवाचा एखादा गोस्वामी (गोसावी) असण्याचा संभव अजीबात टाळतां येत नाहीं. यांपैकीं कांहीं शंका तरी इतरांस पोरकट वाटतील असें त्यांस वाटत होतें (पृ. ५०); तरीहि त्यांनी त्यांवर भर देऊन आपला निर्णय बनविला आहे. त्यांनी रामगडपक्षावर व रामटेकपक्षावरहि कांही आक्षेप घेतले आहेत. रामगडपक्षावरच्या बहुतेक आक्षेपांत ते माझ्याशी सहमत आहेत. मी रामगडपक्षावरचे माझे आक्षेप प्रथम महाराष्ट्र साहित्य पत्रिकेंत (व ३२, अंक १२६) आणि नंतर 'मेघदूतांतील रामगिरि अर्थात् रामटेक' या माझ्या दोन महिन्यांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत सविस्तर मांडले आहेत. त्यात भर घालण्याची आवश्यकता नाही. रामटेकपक्षावर श्री. नानासाहेबांनी घेतलेल्या आक्षेपांचा पुढें विचार करूं. प्रथम त्यांना वाटत असलेल्या प्राथमिक शंका खरोखरच कशा पोकळ आहेत तें दाखवितों.

### चापेकरांच्या शंका व त्यांचीं उत्तरें :

शंका १ व २—" कालिदासाने 'सीता' व 'राम' यांविषयी 'जनकतनया' आणि 'रघुपति' असे संदिग्ध



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शब्द कां योजिले, असें श्री. चापेकर विचारतात. व ते म्हणतात, 'जनकाची मुलगी म्हणजे सीताच कशावरून? सीता ही रामाची बायको म्हणून प्रसिद्ध आहे, जनकाची मुलगी म्हणून नव्हे. शिवाय जनक नांवाचे अनेक राजे होऊन गेले. तसेंच रघुपति म्हणजे रामच कशावरून? तेव्हा कालिदासासारख्या मार्मिक कवीने मुद्दाम आडमार्गाला जाऊन सीता व राम न म्हणतां जनकतनया व रघुपति कां म्हणावें हें एक गूढ आहे. मेघदूतांत रामगिरींतच राम आढळतो; बाकी रामसीतांचें नांव नाहीं. हें कसें?"

उत्तर– वरील शंकांचीं उत्तरें अगदीं सोपीं आहेत. संस्कृत भाषा अत्यन्त संपन्न आहे. तींत एका अर्थाचे अनेक शब्द आहेत. अमरकोशांतील कोणताहि वर्ग पाहा. तेव्हां सामान्यत: 'एकच शब्द अनेकदां योजूं नये' असा नियमच आलंकारिकांनी घालून दिला आहे ( नैकं पदं द्विः प्रयोज्यं प्रायेण ). यांतच संस्कृत भाषेची थोरवी व गोडी आहे. तसेंच एका शब्दाचे अनेक अर्थ होत असले तरी त्यांतील कोणता विवक्षित आहे हें ठरविण्याचीं गमकेंहि त्यांनी सांगितलीं आहेत. त्यांचा उपयोग केला असतां कोठेंहि संदेह राहत नाहीं. कालिदासानें आपल्या रघुवंशांत 'राघव' (सर्ग ११, श्लो.३२), 'दाशरथि' ( ११, ४४ ), 'रघुप्रवीर' ( १४, २९ ), 'रघूद्वह' ( ११, ५४ ), 'रघुनाथ' ( १५,५४ आणि १५,९० ), 'रघुपति' ( १२,१०४ आणि १३,७६ ) अशा विविध शब्दांचा प्रयोग 'राम' या अर्थी केला आहे. तसेंच त्यानें सीतेला 'वैदेही' ( १५,६१ ), 'मैथिली' ( १५,६३ ), 'जनकात्मजा' (१४, ४३ ) इत्यादि शब्दांनी उल्लेखिलें आहे. 'जनकात्मजा' आणि 'जनकतनया' यांत भेद नाहीं. 'रघुवंश' व 'मेघदूत' वाचतांना आतापर्यंत कोणालाहि हे शब्द संदिग्ध वाटले नाहींत व त्यांत कांही गूढाची प्रतीति झाली नाहीं. 'जनक' नांवाचे राजे अनेक होऊन गेले असले आणि रघूच्या वंशांतहि अनेक थोर पुरुष झाले असले तरी मेघदूतांत 'जनकतनया' आणि 'रघुपति' या नांवांच्या सांनिध्यामुळे कोणत्या व्यक्ति कालिदासाला विवक्षित होत्या हें सहज समजतें. तेव्हा यांत गूढ असें कांहीच नाहीं. मेघदूतांत 'राम रामगिरींतच आढळतो, इतरत्र रामसीतांचें नांव आढळत नाहीं,' याचेंहि कारण उघड आहे. ज्या रामगिरीवर यक्ष राहावयास आला तेथें रामाच्या पादुका पूजिल्या जात आणि तेथील जलाशयांत सीतेने स्नान केलें होतें अशी समजूत होती, म्हणून त्याचें पाणी पवित्र गणलें जात असे. म्हणून रामगिरीच्या वर्णनांत कालिदासाने त्यांचा तसा उल्लेख केला आहे. इतर श्लोकांत तसा प्रसंग आला नसल्याने रामसीतांचा निर्देश नाहीं. कालिदास मेघदूतांत यक्षाची कथा वर्णीत होता, रामाची नव्हे.

शंका ३ – रेवा म्हणजे नर्मदा कशावरून? एका नदीला दोन नांवें कां? अशीं नांवें इतर नद्यांच्या बाबतींत आहेत का?

उत्तर – 'कालिदासाला मेघदूताच्या १९ व्या श्लोकांत ( रेवां द्रक्ष्यस्युपलविषमां विन्ध्यपादे विशीर्णाम् ) रेवापदाने नर्मदाच विवक्षित होती यांत संशय नाही. दुसरी कोणती नदी विन्ध्य पर्वताच्या पायथ्याशीं वाहते? कालिदासाने इतरत्रहि रेवा शब्दाचा 'नर्मदा' या अर्थी प्रयोग केला आहे. रघुवंशाच्या सहाव्या सर्गांत ( श्लो. ४३ ) अनूप देशाच्या राजाचें वर्णन करीत असतां सुनन्दा म्हणते –

> अस्याङ्कलक्ष्मीर्भव दीर्घबाहो-
> माहिष्मतीवप्रनितम्बकाञ्चीम् ।
> प्रासादजालैर्जलवेणिरम्यां
> रेवां यदि प्रेक्षितुमस्ति कामः ॥

–यांत नर्मदा नदीच्या कांठच्या माहिष्मती- (सध्याच्या महेश्वर ) नगरीचा उल्लेख आहे. माहिष्मती



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नगरी दुसऱ्या कोणत्याहि नदीच्या कांठीं नव्हती. दुसरा उल्लेख सोळाव्या सर्गांत (श्लो. ३१) आला आहे. कुशाची सेना दक्षिण कोसलांतून ( छत्तीसगडांतून ) अयोध्येला जातांना विन्ध्यपर्वत ओलांडीत असतां रेवेसारखा घोष करून गुहांना प्रतिध्वनीने निनादित चालली होती असें कालिदासाने वर्णिलें आहे—

मार्गैषिणी सा कटकान्तरेषु
वैन्ध्येषु सेना बहुधा विभिन्ना ।
चकार रेवेव महाविरावा
बद्धप्रतिश्रुन्ति गुहामुखानि ॥

—यांतहि विन्ध्यपर्वताच्या उल्लेखामुळें रेवा म्हणजे नर्मदाच होय यांत संशय नाहीं. 'मेघदूतांतील रेवा माळव्यांतील लहानशी नदी असणें अशक्य नाहीं. बघेलखंडांतील रेवा शहराचें नांव त्याच नांवाच्या नदीवरून पडलें नाही कशावरून ?" असें श्री. चापेकर विचारतात. रामटेकविषयी अनेक शंका काढणारे चापेकर ज्या नदीचा ठावठिकाणा माहीत नाहीं व असलीच तर विन्ध्यपर्वताच्या उत्तरेस दूरवर असल्यामुळें जिला 'विन्ध्यपादे विशीर्णाम्' हें वर्णन लागूं पडणें शक्य नाहीं अशी काल्पनिक रेवा नदी मानण्यास तयार झालेले पाहून मौज वाटते. सर्व्हे ऑफ् इंडियाच्या नकाशावर रेवा शहर ज्या नदीच्या कांठी आहे तिला सध्या बीहर असें नांव आहे.

कालिदासकाळीं नर्मदा नदीला रेवा व नर्मदा अशीं दोन नांवें प्रचलित होतीं. 'रेवा' नांवाचे उल्लेख मागे दिले आहेत. 'नर्मदा' नांवाचा उल्लेख रघुवंशाच्या पांचव्या सर्गांत ( श्लो. ४२ ) 'स नर्मदारोधसि सीकरार्द्रैः' इत्यादि श्लोकांत अजाच्या कुंडिनपुरच्या मार्गाच्या वर्णनांत आला आहे. एका नदीला अनेक नांवें असूं नयेत असा कांहीं नियम नाहीं. चापेकरांना याचीं उदाहरणें पाहिजेत तीं देतों. यमुनेला 'कालिन्दी', 'सोमतनया', 'यमस्वसा' अशीं अनेक नांवें आहेत. गंगेचीं तर याच्याहिपेक्षां पुष्कळ नांवें आहेत. तेव्हा 'रेवा व नर्मदा या भिन्न नद्या असाव्या' ही शंकेची परमावधि झाली. 'रेवा तु नर्मदा सोमोद्भवा मेकलकन्यका' या अमरकोशाच्या पंक्तींत त्या एक मानल्या आहेतच. शिवाय कालिदासहि त्यांना एक मानतो हे मागें दाखविलें आहे.

शंका ४ – 'रामगीरिस्वामिनः पादमूलात्' या प्रभावतीगुप्तेच्या ताम्रपटांतील 'स्वामी' विष्णुच कां ? तो 'रामगिरि' नांवाचा एखादा गोस्वामी ( गोसावी ) असण्याचा संभव आहे.

उत्तर – या शंकेचें निराकरण श्री. टिकेकर यांच्या लेखाला 'वसंत' मासिकाच्या फेब्रुवारी १९५९ च्या अंकांत आम्ही दिलेल्या उत्तरांत सापडेल. त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं. हें 'मौलिक' संशोधन टिकेकरांचें कीं चापेकरांचें तें समजत नाहीं. तें प्रसिद्ध करण्यांत मात्र टिकेकरांनी आघाडी मारलेली दिसते. तें कोणाचेंहि असलें तरी सर्वस्वी चूक आहे यांत मात्र संशय नाहीं. प्राचीनकाळीं विष्णु, सूर्य इत्यादि देवांच्या नांवांच्या शेवटीं स्वामी हें पद लावण्याची पद्धत होती. तिची दोन उदाहरणें-(१) श्वेतवराहस्वामी गुप्तकालीन दामोदरपुर ताम्रपटांतील 'भगवतः श्वेतवराहस्वामिनः देवकुले' ( भगवान् श्वेतवराहस्वामीच्या देवळांत ) हा निर्देश पाहा आणि (२) कारीतलाई शिलालेखांतील सोमेश्वर नामक मंत्र्याने स्थापिलेला सोमस्वामी नामक वराह अवतार अशीं आम्ही दिलीं होतीं. याचीं आणखीहि उदाहरणें देतां येतील. खिस्तोत्तर ३०० ते ५०० या काळांत होऊन गेलेले शालंकायन नृपति चित्ररथस्वामीचे उपासक होते. चित्ररथस्वामी म्हणजे सूर्य. कारण त्याच्या रथाला एकच चाक आणि सात घोडे जुंपले असल्यामुळें त्याला चित्ररथ असें नांव पडलें. शंकराच्या नांवाच्या शेवटीं सामान्यतः 'ईश्वर' पद लावीत. उदाहरणार्थ प्रवरेश्वर हें वाकाटक नृपति प्रथम प्रवरसेनाने आपल्या नांवें स्थाप-









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लेल्या शिवलिंगाचें नांव पाहा. पण क्वचित् शंकराचींहि नांवें स्वामिशब्दान्त आढळतात. उदाहरणार्थ, गंगनृपति इंद्रवर्मन् याच्या अच्युतपुरम् ताम्रपटांतील 'सकलभुवननिर्माणैकसूत्रधारस्य भगवतो गोकर्णस्वामिन:' हा निर्देश पाहा. यांत गोकर्णस्वामिन् असा भगवान् शंकराचा उल्लेख आहे. तेव्हां 'रामगिरिस्वामिन: पादमूलात्' यांत रामगिरिस्वामी नामक देवाच्याच पादुकांचा निर्देश आहे, कोणा गोसाव्याच्या पावलांचा नव्हे. आतांपर्यंत सांपडलेल्या शेकडों ताम्रपटांपैकी गोसाव्याच्या पावलां जवळ दिलेला एकतरी ताम्रपट माहीत आहे काय? आतां रामगिरिस्वामी हें देवाचें नांव असल्यास तो देव भगवान् विष्णूचा रामावतारच असला पाहिजे हें उघड आहे. प्रभावतीगुप्तेच्या दुसऱ्या ताम्रपटांतील दान 'कार्त्तिकशुक्लद्वादश्यां भगवत्पादमूले निवेद्य' (कार्तिक शुक्ल द्वादशीस भगवंताच्या पादुकांना अर्पण करून) मग भगवद्भक्ताचार्य चनालस्वामीला दिलें होतें. या पादुकाहि रामगिरीवरील रामचंद्राच्याच असाव्या. वाकाटककाळीं कांहीं व्यापाऱ्यांनीं भगवत्पादमूलांना अर्पण करून ग्रामदानें केलेलीं आढळतात. तींहि रामगिरीवरच केलीं असावीं. तेव्हां रामगिरी स्वामिन् म्हणजे रामगिरीवरचे भगवान् रामचंद्र यांत संशय नाहीं. रामटेकचे पुजारी अद्यापि रामलक्ष्मणांना रामस्वामी व लक्ष्मणस्वामी म्हणतात.

## रामटेकपक्षावर आक्षेप

येथवर चापेकरांच्या प्राथमिक शंकांचा विचार केला. आतां त्यांनी आमच्या 'रामगिरी म्हणजे नागपूरजवळचें रामटेक' या मतावर घेतलेल्या आक्षेपांचा विचार करूं.

आक्षेप पहिला—"रामटेकवर राम कधीच गेला नाहीं असें रामायणावरून दिसतें. रामायणाशी व रामचरित्राशीं दृढ परिचय असलेला कालिदास दंतकथेवर विसंबून अनैतिहासिक लिहिण्यास प्रवृत्त होईल असें वाटत नाहीं."

उत्तर— या तऱ्हेचा आक्षेप अनेक लोक घेतात. पण त्यामध्यें आपण दोन गोष्टींची गल्लत करतों हें त्यांच्या ध्यानांत येत नाहीं. आमचा प्रयत्न कालिदासाने मेघदूतांत उल्लेखिलेला रामगिरि कोठें होता तें शोधण्याचा आहे. 'मेघदूतांतील रामगिरि' हें आमच्या पुस्तकाचें नांव पाहा. आम्ही 'रामायणांतील रामगिरि' शोधीत नाहीं. (वास्तविक रामायणांत रामगिरि पर्वत उल्लेखिला नाहींच.) मेघदूतांतील रामगिरीचा शोध करण्यांस मेघदूताचाच पुरावा ग्राह्य धरला पाहिजे. रामायणाचा आधार घेणें युक्त नाहीं. "रामायणांतील चित्रकूट कोठें होता हें ठरविण्यांस रघुवंशाचा आधार घेणें संशोधनाच्या दृष्टीने युक्त नाहीं ... प्रस्तुत विषयांत आपण वाल्मीकिरामायणाच्या पलीकडे जाणें इष्ट नाहीं" असें चापेकर म्हणतात, तोच न्याय रामगिरीच्या बाबतींत ते कां लावत नाहींत? तेव्हां रामगिरि कोठें होता हें मेघदूतांतील मेघमार्गाच्या वर्णनावरून आपण ठरविलें पाहिजे. तें वर्णन रामटेकासच जुळतें, रामगडास जुळत नाहीं हें आम्ही अनेकदां दाखविलें आहे. (कालिदास, द्वितीयावृत्ति, पृ. १२३; मेघदूतांतील रामगिरि अर्थात् रामटेक, पृ. २६–७५ पाहा.) त्यावर चापेकरांनी घेतलेल्या आक्षेपांचा पुढें विचार करूं. पण ते आक्षेप फोल ठरल्यास केवळ रामायणांत रामटेकवर राम आल्याचा उल्लेख नाहीं म्हणून रामटेक हें रामगिरि असणें शक्य नाहीं, असें म्हणतां येणार नाहीं.

प्रथम आमच्या आक्षेपकांना रामटेकवर राम कधींच आला नव्हता असें सिद्ध करतां येतें काय पाहूं. याकरितां त्यांच्याजवळ भगवान् रामचंद्र वनवासांत सीतेसह ज्या ज्या आश्रमांत राहिले त्यांची पूर्ण यादी असली पाहिजे. त्याचा आधार



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वाल्मीकिरामायण. तेव्हां तें या बाबतींत काय म्हणतें तें पाहूं.

धर्मभृताच्या आश्रमांत कांहीं काळ राहिल्यावर राम अनेक ऋषींच्या आश्रमांत राहत राहत दहा वर्षें घालविते झाले असें खालील श्लोकांत सांगितलें आहे –

उषित्वा स सुखं तत्र पूज्यमानो महर्षिभिः ।
जगाम चाश्रमांस्तेषां पर्यायेण तपस्विनाम् ॥
येषामुषितवान् पूर्वं सकाशे स महास्त्रवित् ।
क्वचित्परिदशान् मासानेकसंवत्सरं क्वचित् ॥
क्वचिच्च चतुरो मासान्पञ्च षट् च परान् क्वचित् ।
अपरत्राधिकान् मासानध्यर्धमधिकं क्वचित् ॥
त्रीन्मासानष्टमासांश्च राघवो न्यवसत्सुखम् ।
तत्र संवसतस्तस्य मुनीनामाश्रमेषु वै ।
रमतश्चानुकूल्येन ययुः संवत्सरा दश ॥

(अरण्यकांड, ११, २३–२७)

—या श्लोकांत भगवान् रामचंद्र भिन्न भिन्न ऋषींच्या आश्रमांत कोठ दीड महिना, कोठें तीन, चार, पांच, सहा, आठ महिने तर कोठें वर्षभर राहत राहत दहा वर्षें घालविते झाले, असें म्हटलें आहे. अर्थात् हे आश्रम निदान पंचवीस–तीस असावे. यांची पूर्ण यादी जोंपर्यंत चापेकरांना उपलब्ध झाली नाही तोंपर्यंत त्यांच्या 'रामटेकवर राम कधीच गेला नाही' या ठांसून केलेल्या विधानांत कांहीच 'राम' राहत नाही आणि तें विधान आमच्या सिद्धान्ताला, ते म्हणतात त्याप्रमाणें, 'मूले कुठारः' होऊं शकत नाही.

भगवान् रामचंद्र रामटेकवर गेले किंवा नाही हें फक्त त्यांनाच किंवा त्यांचें चरित्र लिहिणाऱ्या वाल्मीकीला माहीत ! जोपर्यंत रामटेकवर ते गेले नव्हते असें सिद्ध करणारा पुरावा रामायणांत आढळत नाहीं तोंपर्यंत रामटेकविषयीं आपल्या काळांत प्रचलित असलेल्या दन्तकथेस अनुसरून तेथें राम व सीता यांचें वास्तव्य झालें असें वर्णन करण्यांत कालिदास कांहीं 'अनैतिहासिक' लिहिण्यास प्रवृत्त झाला असें म्हणतां यावयाचें नाहीं. रामटेक वाकाटकांच्या नन्दिवर्धन राजधानीजवळ केवळ तीन मैलांवर आहे हें आम्ही दाखविलें आहे. पुण्यक्षेत्र म्हणून आज निदान सहा सातशें वर्षें त्याची प्रसिद्धि आहे आणि त्याचें प्राचीन नाम रामगिरिच होतें. हेंहि लक्ष्मणाच्या देवळांतील शिलालेखावरून स्पष्ट आहे. प्रभावती गुप्तेच्या ताम्रपटावरून रामगिरिनामक पर्वत विदर्भांत होता व मेघदूतांत वर्णिल्याप्रमाणें तेथें भगवान् रामचंद्राच्या पादुकांची पूजा दीड हजार वर्षांपूर्वी होत असे हेंहि स्पष्ट आहे. विदर्भांत प्राचीनकाळापासून पूज्य गणला गेलेला रामगिरि नांवाचा दुसरा पर्वत नाहीं. "विक्रमादित्यानें आपला आश्रित कालिदास यास प्रभावती राणीकडे पाठविलें होतें असें म्हणण्यास प्रत्यक्ष पुरावा नसला तरी अनुमान करण्यास जागा आहे हें मात्र खरें" अशी कबुली चापेकरांनी प्रांजळपणें दिली आहे. (पृ. ५१). "द्वितीय प्रवरसेनाचें सेतुबन्ध काव्य कालिदासाने रचलें अथवा त्या कामीं त्याने प्रभावतीपुत्राला मदत केली ही आख्यायिका विश्वसनीय म्हणून समजण्यास हरकत नाहीं" असेंहि ते म्हणतात. या कामाकरितां कालिदास नन्दिवर्धनाला आला होता याविषयीं निर्णायक पुरावा नसला तरी तसें म्हणणें 'सयुक्तिक अनुमानावर आधारलेलें आहे असें म्हणतां येईल' हेंहि चापेकर कबूल करतात. मग कालिदासाने आपल्या काळीं प्रचलित असलेल्या समजुतीनुसार रामटेक (प्राचीन रामगिरि) येथें राम व सीता यांचें वास्तव्य होतें असें वर्णन केलें असें अनुमान करण्यांत हरकत कोणती ? इतका पुरावा दुसऱ्या कोणा स्थलाच्या बाबतींत चापेकरांस आढळला आहे काय ? 'रामगड चंद्रगुप्ताच्या राज्यांत येत असेल तेथें कालिदास गेला नसेल असें होत नाहीं' असें चापेकर म्हणतात.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

ण तसें मानण्यास यत्किंचित्हि आधार आहे काय याचा विचार त्यांनी करावा.

आक्षेप दुसरा–" मेघदूतांत रामगिरीला तुंग म्हटलें आहे त्याचें काय करणार ? रामटेक तुंग नाहीं."

उत्तर– 'तुंग' शब्द सापेक्ष आहे. 'तुंग' पर्वत किमान किती उंचीचा पाहिजे याचें गमक कोठेंहि नाहीं. नीचैर्गिरि ( विदिशेजवळचा सध्याचा उदयगिरि ) आणि देवगिरि ( उज्जयिनीच्या वायव्य दिशेस सुमारें २५ मैलांवरची सध्याची देवडुंगरी ) या कालिदासानेच वर्णिलेल्या दोन टेकड्यांच्या मानाने रामटेकची टेकडी फारच उंच आहे. सर्व्हे ऑफ इंडियाच्या नकाशांत तिची उंची १५०० फूट दिली आहे; ही अर्थातच समुद्रसपाटीपासून असावी. तेव्हां तिला तुंग म्हणण्यांत कालिदासाने कांहींच चूक केली नाही.

आक्षेप तिसरा–" मेघदूतांत रामगिरीचें वर्णन 'सरसनिचुल' असें केलें आहे. हें वर्णन रामटेकला लागू पडत नाहीं. निचुल म्हणजे वेत किंवा अन्य वनस्पति हें निश्चित सांगतां येत नाहीं. तथापि ही जलवनस्पति असली पाहिजे. पण रामटेकला नदी नाहीं व वनस्पति उगवण्याइतकें जलहि नाहीं. नदी नसल्यामुळे 'नदीच्या बारीक लाटांत तुझे भ्रूविलास मला दिसत नाहींत' असें यक्ष म्हणतो ( श्लो. १०१ ). हें वर्णन रामटेकास जुळत नाहीं. तसेंच रामटेकास दाट झाडी नाहीं."

उत्तर–श्री. चापेकर रामटेकास गेले होते किंवा नाही हें माहीत नाही. गेले नसले तरी मी माझ्या 'मेघदूतांतील रामगिरि अर्थात् रामटेक' या पुस्तकाची प्रत त्यांस पाठविली होती तिजवरून त्यांना याविषयीं बिनचूक माहिती मिळाली असती. रामटेक गांवांत, तसेंच टेकडीवर व तिच्या पायथ्याशीं अनेक जलाशय आहेत. त्यांपैकीं कित्येकांचा उल्लेख लक्ष्मणाच्या देवळांतील रामदेवराव यादवाच्या काळच्या ( ख्रिस्तोत्तर तेराव्या शतकांतील ) लेखांत आल्याचें मी दाखविलें आहे. रामटेकजवळ एकच नव्हे तर दोन नद्या–कलिपा व सुरनदी या नांवांच्या–सध्यांहि वाहत आहेत, हें मी पूर्वोक्त पुस्तकांत दाखविलें आहे. त्यांचा उल्लेख रामदेवरावकालीन शिलालेखांत आला आहे. रामटेकच्या टेकडीच्या उत्तर बाजूस अद्यापि दाट झाडी आहे. तींत अनेकदां वाघ दृष्टीस पडतो असें तेथील लोक सांगतात. कालिदासाच्या काळाला आज दीड हजार वर्षें झालीं. या काळांत रामटेकवरील झाडी पूर्वींपेक्षां थोडी विरळ झाली असल्यास आश्चर्य नाहीं.

आक्षेप चौथा–'म. म. मिराशींना मालक्षेत्राचा थांग लागला नाहीं.'

उत्तर–'सद्यःसीरोत्कषणसुरभिक्षेत्रमारुह्य मालम्' याचा अर्थ 'नुकतीच नांगरल्यामुळें ज्यांतील शेतें सुगन्धित झालीं आहेत अशा मालप्रदेशावर चढून' असा आहे. माल म्हणजे पठार. अद्यापि हिंदी भाषेंत या अर्थीं हा शब्द रुढ आहे. रामटेकपासून उत्तरेस गेल्यावर सिवनी–छापाऱ्याचें पठार लागतें. तें रामटेकच्या मानाने उंचीवर आहे. त्यास हें वर्णन बरोबर जुळतें. शके ११०२ च्या एका उत्कीर्ण कानडी लेखांत द्वितीय आचुगि राजाने मले ( high lands पठार ) जिंकून डाहलाधिपतीचा ( जबलपुरजवळच्या त्रिपुरीच्या राजाचा ) पराभव केला असें म्हटलें आहे. तें याच पठारला लागू पडतें. सिवनी–छापाऱ्याचें पठार रामटेकजवळून जाणाऱ्या नागपूर–जबलपूर मार्गावरच आहे. मालप्रदेशाचा हा उल्लेख पंचवीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या माझ्या 'कालिदास' ग्रंथाच्या प्रथमावृत्तींत ( पृ. १२१ ) प्रथम दाखविला होता.

आक्षेप पांचवा–'मिराशींच्या हातांत आम्रकूट सांपडला नाहीं असें म्हणावें लागतें. अमरवाडा



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म्हणजे पर्वत नव्हे ही परांजप्यांची तक्रार यथार्थ आहे.'

उत्तर – अमरवाडा म्हणजे आम्रकूट असें आम्ही कोठेंहि म्हटलें नाहीं. अमरकंटक हा आम्रकूटाचा अपभ्रंश आहे असें कांहीं लोक म्हणतात, त्याप्रमाणें अमरवाडा हा आम्रवाटक शब्दाचें अपभ्रष्ट रूप मानण्यास हरकत असूं नये. या स्थलाच्या उत्तरेस टेकड्या ( सातपुड्याच्या ) आहेत. त्यांपैकीच एका उंच टेकडीस आम्रकूट नांव असेल. सध्या तें प्रचारांत नाही; तथापि तें रामटेकच्या उत्तरेच शिवनी–छवाऱ्याचें पठार ओलांडून किंचित् पश्चिमेला वळून नंतर पुन: उत्तरेस गेल्यावर लागतें. तेव्हा या आम्रकूटाचें भौगोलिक स्थान मेघदूतांत वर्णिल्याप्रमाणेंच आहे.

आक्षेप सहावा – " प्रभावतीगुप्तेच्या ताम्रपटांत अनेक उणीवा आहेत. मुख्य म्हणजे दान दिलेल्या माणसांचीं नांवें नाहीत. तेव्हां त्या ताम्रपटाच्या पूर्णत्वाचीच शंका येते. दान दिलेलें अश्वत्थनगर कौशिक मार्गावर असल्याचें लिहिलें आहे. तथापि कौशिकमार्ग कोणता हें अज्ञात आहे हें ताम्रपटांतील वर्णन रामगडलाहि लागू पडण्यासारखें आहे."

उत्तर – प्रभावती गुप्तेच्या ताम्रपटांतल्यासारख्या चुका अनेक ताम्रपटांत आढळतात. उदाहरणार्थ, नाशिक जिल्ह्यांतील आभोण गावी सांपडलेल्या कलचुरि नृपति शंकरगणाच्या सन ५९७ च्या ताम्रपटांत ज्याला तो दिला होता त्या ब्राह्मणाचें नांवच गळलें आहे. अशा कांहीं चुका असल्या तरी हे ताम्रपट बनावट आहेत असें कोणी म्हणत नाहीं. त्यांत सांपडेल त्या माहितीचा उपयोगच केला जातो. तसेंच प्राचीन ग्रामनामें प्रचारांतून गेल्यामुळें सध्या शोधतां येत नाहीत, पण म्हणून कोणी त्यांचे उल्लेख असलेले ताम्रपट टाकाऊ मानत नाहीत.

प्रभावती गुप्तेच्या ताम्रपटांतील वर्णन रामगडलाहि लागू पडेल असें कोणत्या आधारावरून श्री. चापेकर म्हणतात तें समजत नाहीं. वाकाटकांचें राज्य कधीहि रामगडपर्यंत पसरलें नव्हतें. प्राचीन काळीं राजे व राण्या आपल्या राज्यांतून ताम्रपट देत, दुसऱ्यांच्या राज्यांतून नव्हे. शिवाय प्रभावती कधीकाळीं रामगडला गेली होती असा कोठेहि उल्लेख नाहीं.

आक्षेप सातवा– ' विंध्याच्या दक्षिणेस कालिदासाचा रामगिरि असेल तर विंध्य ओलांडून मेघाला जाणें भाग आहे. असें असून विंध्य पर्वताचा उल्लेख कालिदासाने केला नाहीं हें चमत्कारिक नाही काय ?'

उत्तर– रामगिरि ते अलका या मार्गावरचे सर्वच पर्वत, नद्या, नगरें यांचें वर्णन कालिदासाने केलें नाहीं. तो कांहीं या भागाचा भूगोल लिहीत नव्हता. त्याला योग्य वाटलें त्या नदीपर्वताचें वर्णन त्याने केलें आहे. विंध्य पर्वताचा उल्लेख नर्मदानदीच्या वर्णनांत आला आहेच. विंध्याप्रमाणेंच ऋक्षवत् पर्वताचेंहि वर्णन मेघदूतांत नाहीं. पण दोन्हींचा उल्लेख रघुवंशाच्या पांचव्या सर्गांत अयोध्या ते कुंडिनपुर या मार्गाच्या वर्णनांत आला आहे.

आक्षेप आठवा– " देवळें, तीर्थें, देणग्या, दानें इत्यादि गोष्टींवर मिराशींनी भर दिला आहे, पण या गोष्टी म्हणजे रामटेकचें वैशिष्ट्य आहे असें नव्हे... मिराशीचें म्हणणें मान्य केल्यास कल्पनाशक्ति बरीच ताणावी लागेल. कालिदासाच्या पूर्वीपासून खरी वा खोटी पण या टेकडीवर राम व सीता यांचा वास होता व आज जीं देवळें, तीर्थें रामटेकवर आहेत तशींच तीं कालिदासाच्या काळांत होतीं, सीतेची न्हाणी कालिदासाने पाहिली असावी असें समजावें लागेल."

उत्तर– माझें मुख्य प्रमाण रामटेकवर देवळें, तीर्थें आहेत हें नाहीं. मेघदूतांतील रामगिरि कोणता हें ठरविण्याची अविवाद्य कसोटी मेघाचा मार्ग होय असें मी अनेक वेळां म्हटलें आहे. त्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मार्गाचें मेघदूतांतील वर्णन रामटेकासच जुळतें, अन्य कोणत्याहि पर्वतास जुळत नाहीं हें माझें मुख्य प्रमाण आहे. प्रभावती गुप्तेच्या ताम्रपटांतील निर्देशावरून रामगिरि विदर्भांत होता व तेथें मेघदूतांत वर्णन केल्याप्रमाणें भगवान् रामचंद्राच्या पादुकांची पूजा होत असे, हें स्पष्ट आहे. सबंध विदर्भांत प्राचीन काळापासून रामसीतांचें निवासस्थान म्हणून प्रसिद्ध असलेला रामटेकशिवाय दुसरा पर्वत नाहीं हें सिद्ध करण्यापुरताच रामटेकाच्या देवळें; तीर्थें वगैरेंचा प्रमाण म्हणून उपयोग केला आहे. रामटेकचें निदान सातशें वर्षांपूर्वीचें नांव रामगिरिच होतें हें यादवकालीन शिलालेखासारख्या अव्वल दर्जाच्या पुराव्यानें सिद्ध केलें आहे. कालिदासाच्या काळीं विदर्भांत रामगिरि असल्यास तो जेथें अशा आख्यायिका नाहींत त्या ठिकाणापेक्षां जेथें अशा आख्यायिका पूर्वी होत्या आणि आजहि आहेत अशाच ठिकाणीं सांपडणें शक्य आहे. कालिदासकाळीं रामटेक येथील सर्व देवळें होतीं असें आम्हीं कोठेहि म्हटलें नाहीं. मेघदूतांत रामगिरि येथील आश्रमांचें 'जनकतनयास्नानपुण्योदकेषु' असें वर्णन आहे आणि तेराव्या शतकापासून आजपर्यंत रामटेकच्या पर्वतावर सीतेची न्हाणी प्रसिद्ध आहे, यांतील साम्य उल्लेखनीय नाहीं काय ?

**आक्षेप नववा**—'रामटेकची परिस्थिति, तेथील देखावा काव्यरचनेला स्फूर्ति देणारा झाला असेल कां ?'

**उत्तर**— कोणता देखावा काव्यरचनेला स्फूर्ति देईल आणि कोणता देणार नाहीं हें आपणांस निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. कालिदासाच्या मेघदूतावरून तो केवळ उंच पर्वतांचें आणि विशाल नद्यांचेच वर्णन करतो असें नाहीं. नीचैर्गिरि, देवगिरि हे डोंगर ठेंगणेच आहेत, माळव्यांतील सिंधु, निर्विन्ध्या, वननदी, गम्भीरा या नद्याहि मोठ्या नाहींत. श्री. चापेकरांस हें 'शंभर टक्के मान्य' आहे. मग त्यांस या बाबतींत शंका कां उत्पन्न व्हावी ? वर उल्लेखिलेल्या माळव्यांतील नद्यांप्रमाणें रामगिरीवरहि चिरपरिचयामुळें त्याला प्रेम वाटत असणें अशक्य आहे काय ? त्याचें विदर्भांत आगमन झालें असावें असें अनुमान करण्यास अवश्य तो पुरावा आम्ही इतरत्र दिला आहे त्याची पुनरुक्ति करीत नाहीं.

याप्रमाणें श्री. चापेकर यांनी रामटेकपक्षावर घेतलेले आक्षेप शक्य तों त्यांच्याच शब्दांत देऊन त्यांचें निराकरण केलें आहे. त्यावरून **मेघदूतांतील रामगिरि ढगांत नसून नागपूर विभागांत रामटेकगांवाजवळ स्थिर आहे** अशी वाचकांची खात्री होईल अशी आशा आहे.

### एक अभिनव मत

हा प्रदीर्घ लेख संपविण्यापूर्वी श्री. चापेकरांनी पुरस्कारिलेल्या 'कालिदासाचा रामगिरि माळव्यांत होता' या विलक्षण मताचें परीक्षण करणें अवश्य आहे. हें मत पुढील प्रमाणांवर आधारलें आहे—

"कालिदास मूळचा माळव्यांतील असावा असा तर्क कित्येकांनी केला आहे. उज्जयिनी, भिलसा इत्यादि शहरें– जीं मेघदूतांत वर्णिलीं आहेत तीं– माळव्यांतच आहेत. ह्यास्तव कालिदासाचा रामगिरि माळव्यांतच असणें शक्य आहे. मालक्षेत्र म्हणजे माळवा. विंध्याच्या पायथ्याशीं असलेली रेवा नदी विंध्यप्रदेशांतील रेवा शहराजवळची एखादी लहान नदी असणें शक्य आहे. ही नदी विंध्याच्या उत्तरेस होती म्हणून विंध्याचें वर्णन मेघदूतांत आलें नाहीं."

**या मताचें परीक्षण** – रामगिरि माळव्यांत आहे असें श्री. चापेकरांना वाटत असलें तरी त्यांतील नक्की कोणता पर्वत विवक्षित आहे हें त्यांस सांगतां आलें नाही म्हणून त्याचें भौगोलिक स्थान मेघदूतांतील वर्णनास जुळतें काय याचें परीक्षण करतां येत नाही. त्या रामगिरीपासून उत्तरेस जातांना प्रथम मालक्षेत्र, नंतर आम्रकूट पर्वत व पुढें विंध्याच्या पायथ्याशीं खडकाळ भागांत अनेक स्रोतांनी वाहणारी नर्मदा नदी लागते, हें दाखवितां








अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आलें पाहिजे. माल म्हणजे माळरान नव्हे माळव्याचें प्राचीन नांव आकरावन्ती किंवा अवन्ती होतें व ते क्षत्रप रुद्रदामन्च्या गिरनार प्रस्तरलेखांत आलें आहे.

हेंच नांव गुप्तकालांतहि प्रचलित होतें. पुढें मालव गणानें या प्रदेशांत वस्ती केल्यावर त्याला माळवा हें नांव पडलें. तेव्हा माळवा हें नांव 'माल' शब्दापासून व्युत्पादितां येत नाहीं. शिवाय या मतांतील आम्रकूट कोणता? तसेंच रेवा नदी मध्याच्या रेवा शहराजवळ वाहत असल्यास ती ओलांडल्यावर विदिशेला जाण्याकरितां उत्तर दिशा न घेतां नैर्ऋत्य घ्यावी लागेल. इतके ढोबळ दोष ज्या मतांत आहेत त्या मताचा पुरस्कार श्री. चापेकरांनी करावा हें आश्चर्य आहे.

श्री. चापेकरांच्या लेखांत अनेक चुकीचीं विधानें आहेत. त्या सर्वांचा परामर्श घ्यावयाचा तर एक ग्रंथ लिहावा लागेल. मागें त्यांच्या अनेक चुकीच्या विधानाची दुरुस्ती केली आहे. तसेंच, आणखी एक उदाहरण देतों. ते म्हणतात-'कालिदासाला गोदावरी माहीत नाहीं.' मेघदूतांत गोदावरीचा उल्लेख आला नाहीं हें खरें. पण याचें कारण रामगिरि (रामटेक) गोदावरीच्या उत्तरेस आहे आणि रामगिरीहून मेघाचा मार्ग उत्तरेस होता, दक्षिणेस नव्हता. तथापि कालिदासास गोदावरी माहीत नव्हती असें नाहीं. रघुवंशांतील (१३,३३) खालील वर्णन पाहा—

अमूर्विमानान्तरलम्बिनीनां
श्रुत्वा स्वनं काञ्चनकिङ्किणीनाम् ।
प्रत्युद्व्रजन्तीव खमुत्पतन्त्यो
गोदावरीसारसपंक्तयस्त्वाम् ॥

वरील विवेचनावरून मेघदूतांतील रामगिरि सरगुजा संस्थानांत किंवा माळव्यांत नसून विदर्भांतच होता आणि मेघदूतांतील मेघमार्गाच्या वर्णनावरून तो नागपूरपासून २७ मैलांवर असलेलें रामटेकच असणें शक्य आहे याविषयीं पूर्वग्रहदूषित नसलेल्या वाचकांची खात्री होईल अशी आशा आहे.


दम्यासाठीं
नवें औषध
श्वासोनिल

श्वासोनिलमुळें दम्याची धाप थांबते, घुसमट दूर होते, कफ सुटतो व श्वासोच्छ्वास संथ सुरू होऊन शांत झोप लागते.

श्वासोनिलमुळें श्वासमार्गांतील सूज कमी होते, फुफ्फुसांना बल मिळतें. जुनाट ब्राँकायटीसवर तें उत्कृष्ट गुणकारी आहे.

श्वासोनिल हें सर्वस्वी आयुर्वेदीय औषधांपासून तयार केलेलें असून तें बरेच दिवस घेतलें तरी त्यापासून कसलाहि अपाय होत नाहीं.




दम्याचा त्रास कमी करतें!

आयुर्वेदीय अर्कशाला लि.
सातारा
मुंबई विक्रीकेन्द्रः २१८, गिरगांव, मुंबई ४
2/ RA657










अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. शं. वि. वैद्य

# प्रेमप्रतीतिधर्मी कवि तांबे

## तुझें रूप ब्रह्मांड सारें तुझें–

कवीच्या जीवनदृष्टीचा परिणाम त्याच्या काव्यावर अपरिहार्यपणें होत असतो. कारण विशिष्ट अनुभवाचें ग्रहण करीत असतांना त्या अनुभवाचें स्वरूप कवीस त्याच्या जीवनदृष्टीच्या व विशिष्ट कलादृष्टीच्या कोनांतून दिसत जातें व तें आविष्कारांत उमटत असतें. कविवर्य तांबे यांच्या जीवनदृष्टीचा परिणाम त्यांच्या कवितांतून एवढ्या प्रकर्षानें प्रकट झाला आहे कीं त्यांच्या सुसूत्र चिंतनानें त्यांच्या कवितांत एक मनोहर संगति निर्माण केली आहे. भारतीय तत्त्वज्ञानाचा परिणाम तांब्यांच्या जीवनदृष्टीवर फार खोलवर झालेला आहे. जीवन हें आनंदमय आहे ही त्यांची श्रद्धा आहे. त्यांनीं १९२० सालीं लिहिलेल्या एका पत्रांत म्हटलें आहे कीं, "I look upon the visible world as the expression of joy itself ! It is joy that has emanated itself in the innumerable forms and names. Thus, while joy or bliss is in the very nature of the structural frame-work of the universe, it is its very essence, its very nature; sorrow is only foreign to it." तसेंच या जीवनाच्या पाठीशीं डोळस परमेश्वरी शक्ति उभी असून तिनें विशिष्ट हेतूनें मानवी जीवन निर्माण केलें आहे. जीवन हें अखंड विकासी आहे. 'फूल गळें फळ गोड जाहलें' हा त्याचा स्वभाव आहे. मरण ही जीवनचक्रांतली एक अवस्था आहे. मरणाचें भय वाटेल परंतु या वेळेसहि ती डोळस परमेश्वरी शक्ति प्रेमानें आपल्या बरोबर असते. महाप्रस्थान या कवितेंत तांबे या श्रद्धेच्या आधारावरच स्वतःला धीर देतात व म्हणतात –

> जरि वाट तुला नच ठावी
> तीं ऐक पाऊलें प्राणा
> रे धीर धरी तूं पोटीं
> संगिं ये जगाचा राणा.

– हा देह एखाद्या पोशाखासारखा आहे. परमेश्वररूपी आई हा पोशाख आपल्या लाडक्या मुलास चढवून जगांत पाठवते. हीं वस्त्रें जुनीं झालीं कीं पान्हा फुटून आपल्या लाडक्याला ती बोलावून घेते व नवे कपडे चढवून श्रेष्ठतर कार्यास पाठविते. 'पोशाख नवनवा मला दिला ! तूं मुलुख नवनवा दाखविला' या कवितेंत –

> जुनीं जाहलीं वस्त्रें पाहुनि
> बोलविशी मज पान्हा फुटुनी
> उरीं लावुनी, नवीं लेववुनि
> धाडिशीं श्रेष्ठतर कार्यि मला

– अशी श्रद्धा ते प्रकट करतात. म्हणूनच 'पूर्णाहुति' या कवितेंत जीवनाला सनातन अर्थानें ते यज्ञ संबोधतात, "कोणि आणूं नका

> आसवे लोचनीं
> छें ! न ही शून्यता !
> पूर्णता सद्गती !"

असें ते दृढ निश्चयानें म्हणतात. जीवनांविषयीं अशी एक सुसंगत दृष्टि तांब्यांच्या कवितेंत आपणांस आढळते. ती समजावून घेतली कीं तांब्यांच्या कवितांचा अर्थ लावण्याच्या दृष्टीनें फार मोठा उपयोग होतो.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**खळखळे प्रीतीची वाहिनी –**

परमेश्वरी शक्तीच्या विलासांतून जीवनाची निर्मिति असल्यामुळें काव्य, निसर्ग, स्त्री, प्रेम या सर्वांतून तांब्यांना तिचा प्रत्यय येतो. त्या शक्तीस तांबे कधीं देव म्हणतील, कधीं माऊली मानतील, कधीं रमण मानतील. ती शक्ति प्रेमस्वरूप असल्यामुळें प्रेमाच्या विविध छटांशीं अनुरूप अशा स्वरूपांत ती त्यांना आढळली तर नवल नाहीं. 'क्षण सुवर्ण कण झाले रमणा !'' ही कविता वरवर पाहतां प्रेम-कविता वाटली तरी ती काव्यविषयक कविता आहे. आपलें काव्य परमेश्वराचा आपल्या अंतःकरणाशीं संयोग होऊन निर्माण झालं आहे. ते संयोगाचे क्षण सोन्या-सारखे उजळून निघाले आहेत, ते व्यक्त स्वरुपांत असल्यामुळे ते आतां स्पर्शक्षम आहेत. कोणी पारखी टीकाकारानें त्याचें मोल केलें. ती 'दया' हि त्या रमणाकडे रुजू आहे "जाणतो तोच तव थोरपणा" असा तो रमण आहे. हाच परमेश्वर त्या निसर्ग-सौंदर्यांतून क्रीडा करतो आहे. ह्या सौंदर्याचा कारागीर तोच आहे. 'पहा हो कसा हा कारागीर' या कवितेंत हा आशय आढळेल. 'कलेचें हृद्गत' या कवितेंत.

"गगन भेदि हे गिरि पुरातन शुभ्र धवल वदनीं
तुझें अनंता, प्रवचन करती गूढ मूक वचनीं ॥
रूपीं रूपीं तुझी अनंता विभूति विस्तरली ॥"

—असें तांब्यांच्या प्रत्ययाला आलेलें दिसतें. याचमुळें 'रिकामे मधुघट' या कवितेंत 'वृक्ष झऱ्यांचें गूढ मधुर गुज' असें तांबे म्हणतात तेव्हां ह्या विशिष्ट संदर्भांतच त्या ओळीचा अर्थ लावावा लागतो. गूढ, मधुर, या विशेषणांवर थांबून त्यांच्या पाठीमागचा तांब्यांना अभिप्रेत असलेला व्यापक अर्थ ध्यानांत घ्यावा लागतो. परमेश्वराच्या या स्वरूपाची जाणीव कळली पाहिजे. ती मधुर आहे. तेंच माधुर्य —

तेंच फुलांच्या मार्दवि फुललें
सुवर्णवर्णीं उषेंत खुललें
सायंतनिं तरु-गिरि घनिं झुललें,

— असें तांबे आपल्या मनाला 'मंदिरीं मना तव गान भरे' या कवितेंत सांगतात. असा हा परमेश्वर चन्द्र व ताऱ्यांच्या डोळ्यांनीं त्यांना खुणावतांना दिसला तर आश्चर्य नाहीं. ह्याच परमेश्वराची 'कारागिरी' म्हणजे स्त्री आहे. तिच्याकडे केवळ शृंगाराच्या नजरेंतून पाहून चालणार नाहीं.

'पापाची स्मृति राहिली जर नरा पाहून ही सुंदरी
धिग्धिक् ! त्या कळली अगाध हरिची नाहीच
कारागिरी'

— या तांब्यांच्या उद्गारांतून व्यक्त झालेली तांब्यांची विशाल दृष्टी ध्यानांत धरण्याजोगी आहे. ह्या स्त्रीच्या कांतीनें चन्द्र झळझळतो, 'फुला फूलपण' येतें. 'भयचकित नमावें तुजरमणी' या कवितेंतली ही जाणीव तांब्यांच्या व्यापक दृष्टीची साक्ष देते. या दृष्टीमुळेंच 'कान्तेस' या कवितेंत,

"त्वत्प्रेमें कमलास ये कमलता इंदूस इंदुत्व ये
रत्ना रत्नपणा, तुझेविण असें निःसत्व सारें–प्रिये !"

असा प्रेमानुभव तांबे व्यक्त करतात. सान्त अनन्त-रूपी "नटेश्वराची आरती" गातांना 'झळके पुरुष अर्धभागीं — लखलखे नारी अर्धांगीं — सीमा ऐकयाची संगीं" या शब्दांत त्यांनीं त्याचें वर्णन केलें. 'तिच्या' वाचून 'तो' व 'त्याच्या'-वाचून 'ती' व्यर्थ आहे. त्यांच्या संयोगांतून भवगंगा निर्माण होते. या प्रेमानें रम्यता निर्माण होते. 'रम्यता गति ही प्रेमाची.' या अर्ध-नरनारि–नटेशाची लीलाच विविध रूपांतून प्रकट होते. परमेश्वराचा साक्षात्कार अशा रूपांत होणें, अशा प्रेम स्वरूपांत होणें व त्यात प्रेममय, सौंदर्यमय शक्तीचा आविष्कार सर्व भूतांत प्रत्ययाला येणें या भव्य सुसंगत जाणिवेनें तांब्यांच्या कवितेंत चिंतनाची खोली निर्माण केलीच परंतु सबंध कवि-तांत एक मनोहर संगति निर्माण केली. या संग-तीचें एक मनोहर अंग पुढें पाहावयाचें आहे.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## अर्धनरनारि-नटेशाचें प्रतीक

ही अर्धनरनारि-नटेशाची कल्पना मध्यवर्ति धरून तांब्यांच्या प्रेम-कवितांकडे एका वेगळ्या दृष्टीनें पाहतां येतें. अर्धनरनारिनटेश ही कल्पना म्हणजे तांब्यांच्या प्रेमकवितांचें स्वरूप दर्शविणारें एक भव्य प्रतीक आहे. कारण तांब्याच्या प्रेमकवितांत 'तो' आणि 'ती' यांच्या भावजीवनांचा विकास होत असतांनाच तीं जीवनें एकमेकांत मिसळत मिसळत जाऊन विलक्षण एकरूपतेचा प्रत्यय त्यांना आलेला आहे. 'त्यानें' म्हटलेल्या कवितांतून त्याच्या जीवनाचा पायरीपायरीनें झालेला विकास आपणांस दिसतो. 'तिच्या' मुखीं असलेल्या कवितांतून एका स्त्रीच्या जीवनाचा विकास झालेला आपणांस दिसतो. दोघांच्या जीवनाचे धागे परस्परांत विलीन झालेले आहेत व तरीहि वेगळे दिसताहेत हें स्पष्ट दिसतें. हें होत असतांना त्यांचा परस्परांत संवाद, संभाषण चाललें आहे असें आपणांस आढळतें. 'ती रम्या रजनी', 'तूं जिवलगे विद्यावती जाणती !', 'गेली ज्योत विझूनिया', 'शुक्राची मधु चांदणी', 'कालाच्या चढुनी श्रमें०' अशा कवितांत अंतर्गत संभाषण आढळेलच परंतु अशा अनेक कविता आढळतील कीं ज्यांत प्रश्न आणि उत्तराचें नातें आपणास सांपडूं शकेल. उदा० 'ठावा न सुखाचा वारा' या कवितेंत, आपल्या काळजीच्या संसारांत सखीला सुख देतां येत नाहीं याची खंत तो व्यक्त करतो.

> सांखळी, सरी, पाटली आणुं कोठली
> तुझ्या शृंगारी ?
> कोठला जिवलगे, शालु तुला मी घालु
> विसरा मणिहारा
> ठावा न सुखाचा वारा –

त्याच्या या खेंतीस, 'ती रम्या रजनी' या कवितेंतल्या

> 'नाथा प्रीति सदा अशीच असु द्या
> दासीवरीं नम्र या
> आहे ही इतुकी विनंति, दुसरी
> कांही नसे याचना,
> शालू प्रीतिच, शाल ती कनक ती,
> रत्ने हिरे ती प्रिया'

– या ओळींत ती उत्तर देते व,

'स्त्री जातीस पतीच दैवत खरें सर्वस्व तें आमुचें'–असें आश्वासून सांगते व वर बजावते कीं हा काळ, हें यौवन संपून जाणारें आहे तेव्हां "कान्ता, वृत्ति नसो म्हणोनि तुमची सौख्यक्षण-प्रेरित". सखीच्या उत्तरातला गंभीर आशय त्याच्या मनावर खोल ठसा उमटवतो. ती 'विद्यावती' व 'जाणती' आहे हें त्याला केव्हांच पटलेलें आहे. 'तूं जिवलगे विद्यावती जाणती' या कवितेंत तो सांगतो कीं, ज्या 'सुमनीं' मधु नाहीं तेथें भृंग घिरट्या घालणार नाहीं. तें फूल कितीहि सुंदर असो, कितीहि सुवासिक असो 'सन्मति' भृंग अशा फुलांकडे ढुंकूनहि पाहणार नाहीं." अंतःकरणाचें सौन्दर्य जेथें आहे तेथेंच आपलें मन रंगतें असें तो सूचित करतो. तरी ती विचारतेच, 'मी तुम्हांला कां आवडतें ?'–यावर तो उत्तर देतो, "सांगावें तुज काय ? तूं जिवलगे विद्यावती जाणती !" त्या सखीच्या स्पर्शानेंहि तो आपलें-पण विसरून जातो. "गे शपथ तुझी !' या या कवितेंत तो सांगतो, कीं तूंच माझ्या जीवनास सर्वत्र व्यापून आहेस. पाणी विविधरूपीं दिसत तरी तें एक आहे, तसें––

> त्या परि माझ्या विविध तरंगीं
> विविध रंगिं तूं रक्तिमरंगी
> विविध रूपिं तूं अविविधसंगीं
> माझेंपण तुझिया उरीं मुरे ––








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

एवढी सखीशी होणारी एकरूपता तो सांगतो. ' शुक्राची मधु चांदणी ' या कवितेंत तीहि हाच अनुभव सांगते –

" आहाहा ! सुखसागरांत मुरलें
या मंगलीं त्या दिनीं
तेव्हांपासुन पाहिलें मज सख्या,
सांगा पृथक् कां कुणी !

अशा प्रश्नांचें उत्तर ' नाहीं ' हेंच असतें. आपली कांता ही रम्याकृतींची अधिदेवताच आहे, चन्द्र-कमलें यांना तिच्यावरून ओंवाळून टाकावयास तो तयार आहे कारण ' सारा सद्गुणसंग ' तिच्या मुखावर प्रतिबिंबित झाला आहे, तिच्या प्रेमानेंच 'कमलाला कमलत्व, चंद्राला चंद्रत्व आहे ' असा त्याचा अनुभव ' कान्तेस ' या कवितेंतहि तो व्यक्त करतो. ' गेली ज्योत विझूनिया ' या कवितेंतहि तो असेंच बोलूं लागतो. प्रेम नसेल तर –

' गेला जादु, पिशाच विश्व मग हें निःसत्व छायेपरी इंदु इंदु न तो, पिशाच विधुचें ! तारे रवी हीं भुतें ! ' यावर ती– कदाचित् खोचकपणें– सांगते, "मी गेल्यावरहि रविचंद्र जसेच्या तसेंच उगवतील, तुम्ही म्हणता तसें कांही होणार नाहीं ! " यावर तो व्याकुळ होऊन म्हणतो –

" जातां मी रविचंद्र येतिल जसे तैसेच ' - कां गे अशी कांते निष्ठुर बोलुनी हृदय हें फाडूनिया टाकिशी ?
– अनंत जन्माचें शुभसंचित द्विगुणित करण्यासाठीं तूं या क्षणाला जवळ ये, लागल्यास मग हा क्षण विसर असें तो बोलतांना दिसेल. अन्य कवितेंत तीहि मीलनास आतुर असलेली दिसेल. अशा रीतीनें तांब्यांच्या प्रेमकवितांत ' तो ' आणि ' ती ' यांचा सुखसंवाद, सहसंवाद आढळतो. या संवादानें उभय भूमिकांतल्या कविता एकमेकींशीं संलग्न होतात व अर्धनरनारि-नटेशाचें दर्शन या कवितांच्या अंतःस्वरूपांत सुद्धां आढळतें.

## कुणीं बांधिलें दोन जिवांला ?

तांब्यांच्या कवितांतल्या नायकाच्या व त्या नायिकेच्या जीवनाचा विकासहि मोठा लक्षणीय आहे. तो प्रियकराच्या भूमिकेंत आहे, नंतर पतीच्या, नंतर पित्याच्या भूमिकेंत तो दिसतो. त्यानंतर संध्याच्छाया दिसूं लागल्यावर परमेश्वर-माउलीचें चिंतन- तो करतो. ' ती ' प्रेयसी, पत्नी, माता या भूमिकांतून जाते व आपला संसार सुखाचा झाला म्हणून माहेरच्या व आईच्या आठवणी काढीत असते. – तांब्यांची प्रारंभीं सांगितलेली जीवनदृष्टि या कवितांतून सुद्धां प्रकट होतेच. - " जन तुला सावळी म्हणतात ते कींव करावी इतके अंधळे आहेत " असें तांबे म्हणतील. " लोक आपल्याला खुळे म्हणतात, हरकत नाहीं -त्यांचें–आपलें कधींच जुळणार नाहीं. " असें ते सांगतील. " तुझी माझी एवढी एकता झाली आहे कीं व्यक्तित्वाचा बांध आतां गळाला आहे " असा प्रत्यय त्यांना येतो.

कमलदलस्थितजलबिंदू गे
दल हललें ते जुळले दोघे
माझ्या तुझिया या संयोगें
आकृतीचा गे बांध गळे

–यांत या अनुभवाची प्रचीति येईल. संसार ही एक भव्य सतार आहे, तूं व मी त्यावरल्या तारा आहोंत, मदन त्यांना वाजवीत आहे, असें त्यांना कधीं जाणवतें. सखीच्या व आपल्या एकतानतेचा, एकरूपतेचा त्यांचा त्यांनाच विस्मय वाटतो व " कुणीं बांधिलें दोन जिवांला; मंत्रबंधनिं केवळ ? कां ? –– कुणि कोडें माझें उकलिल कां ?' असें ते विचारतील. ' मंत्रबंधनिं केवळ आणि " का ? ' याचें, विशेषतः ' कां ? '– याचें काय उत्तर द्यायचें ? अर्धनरनारि-नटेशाच्या आरतींत ताब्यांनीं तें स्वतः-च दिलेलें आहे. तेंच " संसाराचें मर्म " आहे.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

" विरहांतील ' चित्तरंजन करतांना सुद्धां त्याला ती कशी दिसते तर —

" कधिं रुसतेशी, कधिं हसतेशी
लेकरांमध्यें कधिं रमतेशी
दु:खिं जशी कां पाउस पाडिशी " —

अशी. ही सगुणशक्ति आपलें अंगण झाडतांना पाहून प्रेमानें त्यांचा ऊर भरून येतो. स्त्रीच्या दिव्यतेवर, सामर्थ्यावर नतशीर्ष भूमिकेनें तें कविता लिहितात. पुढें जीवनाचे शेवटचे दिवस येतात तेव्हां तांबे परमेश्वराकडे आर्त बालकाच्या भूमिकेनें पाहतात. निजल्या तान्ह्यावर माउली दृष्टि लावतांना पाहून 'अशीच असशी त्रिभुवन जननी' एवढया भव्यतेप्रत ती मातृत्वाची दृष्टि नेऊन पोहोचवतात. परमेश्वराच्या प्रेमावर विश्वासूनच इहलोकच्या पलीकडच्या प्रवासाला ते सिद्ध होतात. तांब्यांना प्रेम या भावांतूनच परमेश्वराचें दर्शन घडतें, प्रेमांतूनच जीवनानुभवाचें मर्म कळतें, प्रेमानेंच जीवन साफल्य लाभतें म्हणूनच तांबे यांना प्रेमप्रतीतिधर्मी ( Love-mystic ) कवि म्हणतां येईल.

या प्रेमाच्या जाणिवेमुळें इतरांच्या भावभावना तांबे जाणूं शकले. विधवेच्या भावनेचा कोंडमारा सहृदयतेनें तांबे व्यक्त करतात तशी विधुराची भीषण स्थितिहि त्यांनीं फार उत्कटतेनें रंगवली आहे. तरुण-तरुणीच्या प्रेमाचें चित्रण त्यांनीं त्रयस्थाच्या दृष्टिकोनांतून केलें तसें भावाबहिणीचें प्रेम, माता-अपत्याचें प्रेमहि रंगवलें. प्रेमाच्या विविध छटा त्यांनीं रंगवल्या व त्यांत अगदीं उणीव न राहावी म्हणून कीं काय " पन्नास वर्षांनंतर " व ' वाटेच्या मुशाफिरा ' यासारख्या विद्ध मनाच्या अवस्था दर्शविणाऱ्या कविताहि त्यांच्याकडून लिहिल्या गेल्या.

### तांबे–केशवसुत

तांब्यांना समाजांतील वैषम्याची, पारतंत्र्याची जाणीव होती. पण त्यासाठीं त्यांनीं आवाहन केलें तें परमेश्वराला-रुद्राला, शांति, सुख, प्रेम कोठें आहे ? या जगांत त्यांसाठीं नित्य अकांडतांडव चालतें. तेव्हां ' देवा, तूं निजलास कां ? ' असें ते देवाला विचारतील. त्यांची विधवा देव-दैव यांच्यावर अवलंबून राहते. निःशब्द आत्मयज्ञ मधला तो कोठें गेला तेंहि देवाला ठाउक ! अशा ठिकाणीं केशवसुतांचा व्यक्तिवादी आत्मा ' स्वतः ' बंड करून उठतो. दोन कवींच्या दृष्टिकोनांतला हा फरक लक्षणीय आहे.

### क्षण सुवर्ण कण झाले रमणा

तांब्यांच्या विशिष्ट जीवनदृष्टीमुळें त्यांना संसाराचें मर्म समजलें. जीवनाचा मोठ्या उत्कटतेनें, रसिकतेनें व श्रद्धेनें त्यांनीं स्वीकार केला. भावनेला साद देणारी सखी त्यांना मिळाली त्यामुळें ' संसाराचं गोड गीत ' निर्माण झालें. तृप्तीच्या व आशावादाच्या भरभक्कम चबुतऱ्यावर त्यांची कविता उभी राहिली. सखीच्या प्रेमांतूनच या काव्याची निर्मिति झाली व त्या अनुभूतीचा आविष्कार त्यांच्या विशिष्ट कलादृष्टीप्रमाणें त्यांनीं केला. तांब्यांच्या जीवनदृष्टीमुळें त्यांच्या कवितांत एक अंतर्गत संगति निर्माण झाली, भावनेला सखोल चिंतनाची जोड मिळाली.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

श्री. प्र. रा. देशमुख

# सिंधु संस्कृतींतील लोकच ऋग्वेदांतील आर्यांचे शत्रू : ५ :

## डोक्यावरील शिंगें

हरप्पा आणि मोहेंजोदारो येथें उत्खनीत झालेल्या खापराच्या मुद्रांवरून आर्यपूर्व लोकांच्या देवांच्या डोक्यावर शिंगें होतीं हें दिसून येईल. खापरांच्या मुद्रांवरील देवांच्या मूर्तींच्या डोक्यावर शिंगें आहेत. शिंगाशिवाय देवाची मूर्ति नाही. शिंगें हें आर्यपूर्व लोकांच्या देवाचें अविभाज्य लक्षण आहे.

नुसतीं देवांच्याच डोक्यावर शिंगें आहेत असें नाही तर राजे, देवाचे पुजारी श्रेष्ठ लोक इत्यादीं-च्याहि डोक्यांवर शिंगें आहेत. त्या संबंधीं सर जॉन मार्शलचें म्हणणें असें, " Similar horns appear on the heads of various figures at Mohenjodaro (e. g. Plaits XII 18, 22) as well as on the terra-cotta marks figured in plait XC VI – 3. In these cases there can be little doubt that the horns have a special secred significance. In plaits XII 18, and 22 they are certainly the emblems of the diety ; in other cases they seem to have been transferred to the priest or possibly to the votary."

देवांच्या आणि श्रेष्ठ पुरुषांच्या डोक्यावरील शिंगें भारतांतच होतीं असें नाहीं तर तीं प्राचीन सुमेर व बॅबिलोनिया मध्येंहि अगदीं सारख्याच पद्धतीनें अस्तित्वांत होतीं. जगांतील पुष्कळशा देशांतील देवांच्या डोक्यावर शिंगें होतीं. त्यावरून ज्या ज्या देशांतील देवांच्या डोक्यांवर शिंगें होतीं. त्यांची संस्कृति एक होती अथवा ती एका देशांतून दुसऱ्या देशांत गेली असें मात्र म्हणता येत नाहीं. प्राचीन सुमेर आणि बॅबिलोनिया मध्येहि देवांच्या डोक्यांवरील शिंगाप्रमाणें राजे आणि देवांचे पुजारी यांच्या डोक्यावरहि शिंगांच्या देवाचे प्रतिनिधि म्हणून शिंगें असत. सर्व देवांना शिंगें होतीं त्यामुळें तीं कोणत्या विशिष्ट देवाचें चिन्ह असावें असें दिसत नाही.

वृषभाची पूजा करण्याच्या पद्धति पासून शिंगें धारण करण्याची पद्धति मुळांत उत्पन्न झाली असावी असें दिसतें. सिंधु संस्कृतींत वृषभाला फार महत्त्व होतें असें उत्खननांतून उपलब्ध झालेल्या तत्कालीन खापराच्या मुद्रावरून दिसून येतें. वृषभाच्या शिंगांत अतिमानुष शक्ति, प्रजननशीलता, पावित्र्य, यश आणि समृद्धि समाविष्ट झाली आहे असा समज असल्यामुळें वृषभाचीं शिंगें डोक्यांवर धारण केलीं जात असावीं. पुढें तो एक प्रघात झाला व श्रेष्ठ लोकांत शिंगें धारण करणें ही एक आवश्यक धार्मिक बाब होऊन बसली. शिंगें धारण करणें ही नित्याची धार्मिक बाब झाल्यामुळें तिचा वरच्या वर्गांत सर्वत्र प्रचार झाला. खालील वर्गाच्या लोकांना शिंगें धारण करण्याचा मज्जाव होता अथवा नाहीं हें निश्चित सांगतां येत नाही. परंतु बहुधां मज्जाव असण्याचीच शक्यता असावी असें दिसतें.

सिंधुसंस्कृतींत डोक्यावर शिंगें धारण करण्याचा प्रघात होता हें उत्खननांतील पुराव्यावरून निश्चित होतें. तसेंच ऋचांतून वर्णन असलेल्या आर्यांच्या शत्रूंच्या आणि त्यांच्या देवांच्या डोक्यावरहि शिंगें धारण करण्याचा प्रघात होता असें दाखविल्यास



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सिंधुसंस्कृतींतील लोकच आर्यांचे शत्रू होते हें निश्चित होईल. सिंधुसंस्कृतींतील लोकांचें ऋचांतून वर्णन असलेल्या आर्यांच्या शत्रूशीं रंग, रूप, सांपत्तिक स्थिति आणि उद्योगधंदे इत्यादि सामान्य गोष्टींत आणि तटबंदीच्या शहरांची संस्कृति असणें, शहराचा विनाश आणि संघर्षांच्या स्वरुपांत ऐकात्म्य इत्यादि विशिष्ट गोष्टींत एकरूपता असल्यामुळें सिंधुसंस्कृतींतील लोकच ऋग्वेदांत वर्णन असलेले आर्यांचे शत्रू होत हें संशयातीत सिद्ध झालें आहे. शिंगें धारण करण्यासारख्या अगदीं खास विशिष्ट गोष्टींतहि त्यांचें सामान्यत्व आहे असें दाखवून दिल्यास त्यांच्या एकत्वाबद्दल संशय घेण्यास मुळींच जागा उरणार नाही.

## दासांचे शिंगाचे देव

सिंधु उत्खननांतील पुराव्यावरून सिंधु संस्कृतींत शिंगें देवाचें अविभाज्य लक्षण असल्याचें आपण पाहिलें. ऋचांतूनहि आर्यांच्या शत्रूंच्या देवांच्या डोक्यावर शिंगें असल्याचें निश्चितपणें दिसतें. ऋचा ७ ९९-४ मध्यें इन्द्राविष्णूनें डोक्यावर शिंगें असलेल्या दासांच्या देवाची माया युद्धांत नाहीशी केली असें वर्णन आहे. त्या ऋचेचा अर्थ असा : "तुम्ही ( इन्द्राविष्णूने ) यज्ञासाठीं भूमि विस्तीर्ण केली. सूर्य, उषा आणि अग्नि यांना उत्पन्न केलें. (आणि) संग्रामांत शिंगें धारण करणाऱ्या दासाची माया नष्ट केली." या ऋचेंत दास शब्द विवक्षित मनुष्यवाचक अथवा दास-वर्गवाचक असलेला दिसत नाही तो त्यांच्या देवाचा द्योतक आहे. कारण त्याच्या मायेचा इन्द्राविष्णूनें समर यज्ञांत संहार केला असें वर्णन दासांच्या देवाचा दास असा उल्लेख अनेक ऋचांतून आहे. ऋचा १०-९९-६ मध्यें दासांच्या तीन तोंडाच्या, सहा डोळ्यांच्या विश्वरूप नांवाच्या देवाचा दास असा उल्लेख आहे. वरील ऋचेंतहि दास हा शब्द दासांच्या देवाचा द्योतक आहे त्याचें वर्णन 'वृषशिप्र' म्हणजे शिंगें धारण करणारा असें केलें आहे.

## 'वृषशिप्र' या शब्दाचा अर्थ

'वृषशिप्र' या सामासिक शब्दांत वृष आणि शिप्र असे दोन शब्द आहेत. वृष या शब्दाचा अर्थ बैल असा स्पष्ट आहे. 'शिप्र' या शब्दाच्या अर्थाबद्दल कांहीसा विचार करण्याची जरूरी आहे. 'शिप्र' शब्दाचीं निरनिराळी रूपें ऋचांतून एकूण तेवीस वेळां आलीं आहेत. त्यांत 'शिप्रिन्' म्हणून इन्द्राला सहा ऋचांतून संबोधिलें आहे. शिप्र शब्दाचे निरुक्त यास्काने 'शिप्रे हनू नासिके वा' (६-१७) म्हणजे हनुवटी अथवा नाकपुड्या असें दिलें आहे. सायणाचार्यांनें कदाचित् यास्काने दिलेला अर्थ बरोबर असल्याबद्दल संशय वाटल्यावरून 'शिप्रिन्' (७-२५-३) शब्दाचा अर्थ 'उष्णीषिन्' म्हणजे शिरस्त्राण असलेला असा दिला आहे. 'शिप्रिन्' शब्दावरील ऋचा ८-१-२७ मधील सायणाचें भाष्य असें "शिप्रं शिरस्त्राणम् । प्रशंसायामि निः । शोभन शिरस्त्राणः । यद्वा शिप्रे हनू नासिके वा । तद्वान् ।" शिप्र शब्दाच्या अर्थाबद्दल सायणाचार्य निश्चित नाही हें वरील भाष्यावरून आढळून येईल. सायणाच्या मताप्रमाणें शिप्र शब्दाचे दोन अर्थ दिसतात एक शिरस्त्राण आणि दुसरा यास्काने निरुक्तांत दिलेला हनुवटी अथवा नाकपुड्या. म. म. पां. वा. काणे यांनीं 'वृषशिप्र' शब्दाचा अर्थ "Having nose or chin like a bull" असा दिला आहे [२] हा अर्थ यास्काच्या निरुक्ताप्रमाणें दिला आहे असें दिसतें. परंतु तो निरर्थक व अर्थशून्य असून बरोबर नाहीं असें दिसतें;

१. उरुं यज्ञाय चक्रथुरु लोकं जनयन्ता सूर्यमुषासमग्निम् ।
दासस्य चिद्वृषशिप्रस्य माया जघ्नथुर्नरा पृतनाज्येषु ॥ ( ऋ. ७-९९-४ )

२. ( Presidential Address Indian History Congress 1953, Page 21 )



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कारण मनुष्य कसाहि असला, जरी तो दास असला तरी त्याचें नाक अथवा हनुवटी बैलाच्या नाका-सारखी अथवा हनुवटी सारखी असणें संभवत नाहीं. यास्कानें निरुक्तांत दिलेला आणि म. म. पां वा. काणे यांनी आपल्या इतिहास कॉंग्रेस मधील अध्यक्षीय भाषणांत उद्धृत केलेला 'शिप्र' या शब्दाचा नाकपुड्या अथवा हनुवटी हा अर्थ बरो-बर नाही इतकेंच नव्हें तर तो वरील ऋचेच्या संद-र्भांत जुळत देखील नाहीं. यास्काचा अर्थ बरोबर नाही असें वाटून सायणाचार्यानें भाष्यांत 'शिप्र' या शब्दाचा अर्थ शिरस्त्राण असा दिला आहे. तसें करीत असतां अथवा हनुवटी अथवा नाकपुड्या (हनू नासिके वा) असेंहि म्हणून ठेवलें. इन्द्राला शिप्रिन् म्हणजे (निरुक्तांतील अर्थाप्रमाणें) हनुवटी अथवा नाक असलेला असें म्हणण्यांत कांहीहि स्वारस्य नाहीं. इन्द्र युद्ध करणारा देव आहे. दस्यूंचें हनन करण्यासाठीं, त्यांचीं शहरें फोडण्यासाठीं, त्यांच्या गायी आणि धनें लुटून आणण्यासाठीं, त्याचें वज्र सदैव उन्नत असतें अशा झुंजार देवांच्या हातांत वज्र आणि शत्रूंचे वार टाळण्यासाठी डोक्यावर शिरस्त्राणच असणें योग्य दिसतें. सायणानें शिप्र शब्दाचा शिरस्त्राण असा दिलेला अर्थच बरोबर दिसतो. डोक्यावर शिरस्त्राण असलेला याच अर्थी इन्द्राला 'शिप्रिन्' असें म्हटलें आहे. नाक अथवा हनुवटी असणारा असें म्हणण्यांत अर्थ अथवा स्वारस्य नाहीं.

ऋचांतील शब्दांचे अर्थ इतरत्र शोधण्यापेक्षां ते ऋचांतूनच शोधून काढावे हा ऋचांतील शब्दांचे अर्थ शोधून काढण्याबद्दल सामान्य महत्त्वाचा नियम आहे. त्याप्रमाणें पाहिलें असतां शिप्र म्हणजे मुकुट हाच अर्थ बरोबर दिसतो. ऋचा ५–११–५४ मध्यें मरुतांचें वर्णन आहे. त्यांत 'शिप्राः शीर्षसु वितता हिरण्ययीः' (मरुतांचे) डोक्यावर सोन्याचे मुकुट शोभतात असें त्यांचें वर्णन आहे. वरील ऋचेंत 'शिप्र' शब्दाचा अर्थ मुकुट असल्याचें स्पष्ट आहे. तसेंच ऋचा ८–७–२५ मध्येंहि मरुतांचें वर्णन आहे. त्यांतहि त्यांचें "शिप्राः शीर्षन्हिरण्ययीः" म्हणजे डोक्यावर सोन्याचे मुकुट असलेले असेंच वर्णन आहे. त्यावरील सायणाचें भाष्य "शीर्षन् शीर्ष्णि शिरस्यात्मीयेषु शिरःसु हिरण्ययीः स्वर्णमयानि शिप्राः शिरस्त्राणानि श्रिये शोभार्थं व्यञ्जत व्यञ्जयन्ति। व्यक्ती कुर्वन्ति। धार-यन्तीत्यर्थः।" असें आहे. वरील दोन्ही ऋचां-वरून 'शिप्र' शब्दाचा अर्थ मुकुट अथवा शिर-स्त्राण आहे हें निश्चित दिसतें.

'वृषशिप्र' या सामासिक शब्दाचा अर्थ बैला-सारखे मुकुट असलेला अथवा डोक्यावर शिंगाचे मुकुट असलेला असा स्पष्ट आहे. म. म. पां. वा. काणे यानीं दिलेला बैलासारखें नाक अथवा हनुवटी असलेला हा अर्थ निरर्थक आणि चुकीचा आहे हें दिसून येईल. "वृषशिप्रस्य दासस्य माया जघ्नथुर्नरः" याचा अर्थ 'बैलासारखे (शिंगाचे) मुकुट असलेल्या दासाच्या मायेचें इन्द्रा–विष्णूने हनन केलें' हा सरळ आणि स्पष्ट अर्थ आहे.

दासांच्या देवाचे 'वृषशिप्र' म्हणजे शिंगाचा मुकुट असलेला असें ऋचांतून वर्णन आहे. हरप्पा आणि मोहेंजोदारो येथील उत्खननांतील पुराव्या-वरूनहि सिंधुसंस्कृतींतील लोकांच्या देवांच्या डोक्या-वर शिंगें आहेत हें सिद्ध झालें आहे. ह्या पूर्वी ऋचांतून वर्णन असलेले आर्यांचे शत्रू आणि सिंधु-संस्कृतींतील आर्यपूर्व लोक यांची शहराची संस्कृति, शहरांचा सारखेपणा, शहरांचा एकाच पद्धतीने झालेला विनाश, तसेंच त्यांचे रंग, रूप, सांपत्तिक-स्थिति, उद्योगधंदे, इत्यादींतील सारखेपणावरून ते एकच आहेत हें आपण पाहिलें. देवांच्या डोक्या-वरचीं शिंगें हें वैशिष्ट्य देखील दोहोंतहि सारखेंच आहे. त्यावरून ते दोन्ही एकच आहेत याबद्दल शंका घेण्यास बिलकूल जागा उरत नाहीं.








अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## माणसांच्या डोक्यावर शिंगें

सुरुवातीस उद्‌धृत केलेल्या उताऱ्यावरून दिसून येतें कीं सिंधुसंस्कृतींत केवळ देवांच्याच डोक्यावर शिंगाचे मुकुट नसत तर देवांचे पुजारी राजे आणि श्रेष्ठ पुरुषहि डोक्यावर शिंगें धारण करीत. आर्यांच्या शत्रूंच्या ऋचांतील वर्णनावरूनहि तीच गोष्ट सिद्ध होते. ऋचा १–३३–१२ मध्यें कुत्सानें शिंगें असलेल्या शुष्णाला ठार मारल्याचें वर्णन आहे. त्यांत शुष्णाचें वर्णन 'शृङ्गिणं शुष्णम्' म्हणजे शिंगें असलेला शुष्ण असें केलें आहे. यावरून ऋचांत वर्णन असलेल्या आर्यांच्या शत्रूंच्या डोक्यांवर शिंगें असत हें निश्चित दिसतें. त्यावरूनहि सिंधुसंस्कृतींतील लोकांचें आणि ऋचांतून वर्णन असलेल्या आर्यांच्या शत्रूंचें ऐकात्म्यच दिसतें.

आर्यांच्या शत्रूंपैकीं कांही जमाती शिंगें धारण करणाऱ्या असाव्या असेंहि ऋचांतील वर्णनावरून दिसतें. "दाशराज्ञ" युद्धांत भाग घेणाऱ्या पांच अनार्य जमातीपैकीं एका जमातीचें 'विषाणिनः' (७-१८-७) म्हणजे शिंगें असलेले असें वर्णन आहे.

## आर्यांच्या देवांचा शिंगाशीं संबंध

सिंधु संस्कृतीशीं साम्यदर्शक अनेक गोष्टी ऋचांतून आढळतात, त्यांपैकीं देवांच्या डोक्यांवरील शिंगें ही प्रमुख होय. ऋचांतून अग्नि, इन्द्र, ब्रह्मणस्पति इत्यादि देवांना भयंकर आणि अणकुचिदार शिंगें असलेल्या बैलांची उपमा दिली आहे. ऋचा १-१४०-६ मध्यें अग्नीला डरकाळ्या फोडीत धावणाऱ्या भयंकर शिंगाच्या वृषभाची उपमा दिली आहे. ऋचा ४-५८-३ मध्यें अग्नीच्या स्वरूपाचें रूपकात्मक वर्णन केलें आहे. त्यांत त्याचे चार शिंगें, तीन पाय, दोन शिरें, सात हात असलेला, तिहेरी बांधलेला, वृषभ मोठा आवाज करीत मर्त्यांत प्रविष्ट झाला असें वर्णन आहे. ऋचा ६-१६-३९ मध्यें अग्नीचें 'तिग्मशृङ्गो वृषभो न" तीक्ष्ण शृंगाच्या बैलाप्रमाणे असें वर्णन आहे. अशा प्रकारची उपमात्मक वर्णनें ऋचांतून आणखीहि आढळतील. वरील वर्णनाचें जरा बारकाईनें निरीक्षण केल्यास ती एकतर उपमात्मक अथवा रूपकात्मक असल्याचें आढळून येईल. सायणाच्या भाष्याप्रमाणें ऋचा ४-५८-३ वर्णनांत 'यज्ञात्मक' अग्नीची स्तुति केली आहे. त्यात त्याला वृषभ कल्पिलें आहे व चार वेद त्याचीं चार शिंगें आहेत असें म्हटलें आहे 'चत्वारि शृङ्गा' यावरील सायणाचें भाष्य 'चत्वारि वेदाः शृङ्गस्थानीयाः' शिंगाचे ठिकाणीं चार वेद असें आहे. म्हणजे चार वेदांना यज्ञात्मक अग्निरुपी वृषभाचीं चार शिंगें कल्पिलीं आहेत. यास्काच्या निरुक्ताप्रमाणे हें रूपक सवित्यांचेंहि असणें शक्य आहे. निरुक्तांत हें सगळें रूपक सवित्याला लावून दाखविलें आहे. चार दिशा सवित्याची चार शिंगें आहेत असें त्यांत म्हटलें आहे. रूपकांत वास्तविक कोणत्या देवाचें वर्णन केलें आहे याचा विचार येथें प्रस्तुत नाहीं. वेदांतून वृषभाचीं आणि शिंगाचीं जीं वर्णनें आलीं आहेत तीं केवळ उपमात्मक व रूपकात्मक आहेत. आर्यांच्या देवांना खरीखुरीं शिंगें नाहींत अथवा आर्य वृषभाचे पूजकहि नाहीत हें येथें प्रामुख्यानें दाखवायाचें आहे. ऋचांतून वैदिक देवांना वृषभाच्या नुसत्या उपमा दिल्या आहेत आणि त्या अनुषंगानें निरनिराळ्या वस्तूंना त्यांचीं शिंग कल्पिलीं आहेत हें वरील भाष्यावरून निदर्शनास येईल. वैदिक देवांना विशेषतः अग्नीला शिंगें आहेत असा असलेला समज बरोबर नाहीं हें दिसून येईल. आर्यांच्या कोणत्याहि देवांना शिंगें नाहींत. ऋचांतून वैदिक देवांना दिलेल्या वृषभाच्या उपमा आणि वर्णिलेलीं शिंगें हा आर्यपूर्व वृषभपूजकांच्या प्राचीन संस्कृतीचा आर्यांच्या संस्कृतीवर पडलेला प्रभाव होय हें इतरत्र विस्तारानें दाखविलें आहे.

---

३. 'नवभारत' डिसेंबर १९५८











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

### शिंगांचे अवशेष

शिवाच्या डोक्यावर दिसणारा चंद्र मुळांत त्याच्या डोक्यावरील शिंगें असण्याचा संभव आहे; कारण शिव आर्यपूर्वांचा देव असल्यामुळें त्यांच्या डोक्यावर शिंगें असणें संभवतें. परंतु शिवाचा आर्यांनीं स्वीकार केल्यानंतर अनार्यत्व दर्शक शिंगांचें चंद्रांत रूपांतर होणें अस्वाभाविक नाहीं.

अनार्यांच्या देवांच्या डोक्यावर शिंगें आहेत. बस्तर भागांतील माडिया गोंड देवांच्या, राजाच्या, अथवा श्रेष्ठ पुरुषांच्या भूमिका करतांना डोक्यावर शिंगें धारण करतात.

### शिंगें धारण करण्याच्या प्राचीन चालींचें आधुनिक समाजांतील अस्तित्व

भारत हा अत्यंत प्राचीन देश असून त्यांत फार प्राचीन काळापासून म्हणजे सुमारें पांच हजार वर्षांपासून चालत आलेल्या बऱ्याचशा चालीरीती अद्यापिहि जशाच्या तशाच चालू आहेत. त्या दैनंदिन जीवनाचा एक अविभाज्य भाग झाल्या आहेत. आणि त्यांचें धार्मिक आचारांत रूपांतर झालें आहे. काळाच्या दूरपणामुळें कांहींचे अर्थ नाहीसे झाले आहेत. तरी त्यांचें आचरण मात्र बंद झालें नाही. त्यापैकीं एक चाल प्रभातीं स्नान करून शुचिर्भूत झाल्यानंतर गंध लावणें ही होय. गंध चंदनाचें केशर घालून तयार केलेलें असतें आणि स्नान झाल्यावर तें कपाळावर लावावयाचें असतें. वैष्णवाचें उभें गंध असो अथवा शैवाचें आडवें गंध असो दोन्हीचीं टोकें मात्र शिंगाप्रमाणें वरच असतात.

प्राचीन सिंधुसंस्कृतींतील लोक आणि ऋचांतून वर्णन असलेले आर्यांचे शत्रू एकच असून ते डोक्यावर शिंगें धारण करीत असत हें वर आलेंच आहे. शिंगें प्रथमतः वृषभाचें बल आणि प्रजनन शक्ति प्राप्त होण्यासाठीं लावलीं जात असावीं. पुढें ती एक धार्मिक आचरणाची बाब झाली. शिंगें लावणें पुढें त्रासदायक व गैरसोयीचें वाटल्यामुळें त्याचें प्रतीक म्हणून मस्तकावर चंदनानें शिंगाचें चित्र काढण्याची चाल पडली असणें संभवतें. गंध लावणें शुभत्व-दर्शक व आयुरारोग्य तुष्टि पुष्टि दायक असून त्यामुळें सौंदर्याची वृद्धि होत असल्यामुळें कपाळावर गंध लावणें ही एक दैनंदिन जीवनांतील धार्मिक आचरणाची बाब झाली आहे. गंध न लावणें अशुभ-सूचक समजलें जातें. वृषभपूजक आर्यपूर्वांची शिंगाचें प्रतीक धारण करण्याची चाल त्यांच्या शहरांचा नाश झाला तरी जशीच्या तशीच कायम राहिली. पुढें तिचा स्वीकार आर्यांनीहि केल्यामुळें ती शतकानुशतकें टिकून राहिली आहे.

### बाशिंग

आर्य पूर्वांच्या डोक्यावर शिंगें धारण करण्याच्या पद्धतीशीं संबंध दाखविणारी आणखीहि एक महत्त्वाची गोष्ट प्रचलीत समाजांत रूढ आहे. ती म्हणजे विवाहाचे वेळीं बांधलें जाणारें ' बाशिंग ' ही होय. बाशिंग हा प्राकृत शब्द ' बा ' आणि ' शिंग ' अशा दोन शब्दाचा मिळून सामासिक शब्द झाला आहे. त्याचा अर्थ दोन शिंगें असा आहे. ' बा ' हा प्राकृत शब्द संस्कृत ' द्वे ' या अर्थीं आहे. प्राकृत भाषा संस्कृत नंतरची आहे असें मानण्याचें कारण नाहीं. ऋचांतून प्राकृत भाषेचा प्रचार फार आहे. ' वे ' म्हणजे दोन हा शब्द याच अर्थानें ऋचांतून वापरलेला आढळतो. तेव्हां बाशिंग हा शब्द प्राकृत असल्यामुळें बाशिंगाची चाल अलिकडची असावी असें मानण्यांत चूक होईल. बाशिंग बांधण्याची चाल फार प्राचीन असून ती भारतांत सर्वत्र आहे. ती हिंदूंत आणि मुसलमानांत सारखीच आहे. बाशिंगाचा अर्थ जरी दोन शिंगें असा आहे तरी तें खऱ्याखुऱ्या अथवा कागदाच्या फुलाचें अथवा त्यासारख्या इतर पदार्थांचे बनविलेलें असतें. ब्राह्मण वगैरे उच्च जातीत बाशिंगाऐवजीं मुंडावळ्या बांधतात परंतु हाहि बाशिंगाचाच





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

एक प्रकार आहे. भारतीय कल्पनेप्रमाणें विवाह ही मनुष्याच्या जीवनांतील फार महत्त्वाची घटना होय. त्या वेळीं मनुष्याला देवत्व येतें. लग्न होणाऱ्या मुलाला नवर'देव' म्हणतात. देवत्वाची खूण म्हणून त्याच्या डोक्यावर दोन शिंगें बांधतात. आर्य पूर्वीच्या देवाचें शिंग हें अविभाज्य लक्षण आहे हें आपण पाहिलेंच आहे. आजहि नवरदेवाला देवत्व आणण्यासाठीं डोक्यावर शिंगें बांधावीं लागतात. कपाळावर शिंगाच्या आकाराचें कुंकवानें चित्रहि काढतात. शिंगें आणि देवत्व यांचा आर्यपूर्व संस्कृतींतील संबंध आजहि आपल्या समाजांत कायम असलेला दिसतो. पांच हजार वर्षाच्या अवधींत झालेल्या सांस्कृतिक संक्रमणांतूनहि सातत्य कायम राहिलें आहे.

### शिंगें धारण करणारा समाज

आजहि डोक्यावर शिंगें धारण करणारे लोक आहेत. त्यांच्या संबंधीं जरूर तेवढी माहिती देऊन त्यांच्या शिंगें धारण करण्याचा सिंधु संस्कृतींतील शिंगें धारण करण्याच्या पद्धतीशीं कांहीं संबंध आहे अथवा नाही हें पाहणें प्रस्तुत असल्यामुळें त्यांच्या संबंधीं अवश्य ती माहिती थोडक्यांत द्यावयाचें ठरविलें आहे.

फार प्राचीनकाळीं राजस्थानच्या मरुभूमींत दुसरीकडून कांही लोकसमूह आलेत. ते कोठून आले त्यासंबंधीं निश्चित माहिती नाही. त्यापैकीं कांही लोक गायींचें पालन करीत असत. ते आपल्या गायीबैलांचा धान्याची ने-आण करण्यासाठीहि उपयोग करीत. पुढें पुढें त्यांनीं नुसताच बैलाच्या पाठीवरून धान्याची ने-आण करण्याचा धंदा पत्करला. या लोकांनीं फार अलिकडच्या काळांत मोगलांच्या सैन्याला व त्यानंतर मराठे व इंग्रजांच्या सैन्याला रसद पुरविण्याचें काम स्वीकारलें. इंग्रजाचें राज्य कायम झाल्यावर व पक्के मार्ग निर्माण झाल्यामुळें धान्याच्या वाहतुकीचें काम नाहीसें झालें व एवढे मोठे बैलांचे तांडे बाळगण्याचें प्रयोजन राहिलें नाही. इंग्रजाच्या सैन्याबरोबर आलेले हे लोक विदर्भांत व मराठवाड्यांत स्थायिक झाले.

या लोकांचें नांव 'बंजारा' संस्कृत 'वाणिज्यकाराः' म्हणजे व्यापार करणारे असें आहे. त्यांच्या पोशाखाचें आणि भाषेचें मारवाडी पोशाखाशीं आणि भाषेशीं बरेंच साम्य आहे. मनुष्यांच्या पोशाखांत त्याच दर्जाच्या इतर मनुष्यांच्या पोशाखापेक्षां अगदींच निराळा आहे. त्या मारवाडी पद्धतीचा काळसर लाल रंगाचा घागरा नेसतात व वर ओढणी पांघरतात. अंगांत घालावयाच्या पोलक्याला लहान आरशे कवड्या वगैरे लावून सजवितात. केसाला मागच्या बाजूने गोंडे बांधले असतात आणि समोरच्या बाजूला कानाजवळ दोन्ही बाजूस केसाला घंटेच्या आकाराची चांदीचीं दोन आभूषणें बांधलीं असतात. नाकांत फार मोठी नथ असते. हातांत कोपरा पावेतो हस्तिदंताच्या रुंद बांगड्या घालतात. यांचा मुख्य विशेष म्हणजे विवाहित स्त्रियांच्या डोक्यावर मागच्या बाजूला शिंगासारख्या खैराच्या लाकडाच्या दोन लहान काड्या खोवलेल्या असतात. त्याना बंजारी लोक "चंदा" म्हणतात व इतर लोक शिंगें म्हणतात. यवतमाळ जिल्ह्यांत हीं शिंगें दोन असतात व कोठें-कोठें हें शिंग एकहि असतें. बंजारा स्त्रीचा दर्जा तिच्या शिंगाच्या कोनावरून समजला जातो. अगदीं सरळ ९०°चा कोन करून डोक्यावर शिंग असलेल्या स्त्रीचा दर्जा ९०° पेक्षां मोठा कोन करून बांधलेल्या शिंगाच्या स्त्रीपेक्षां मोठा समजला जातो. बंजारा स्त्री आपल्या ओढणीचा पदर शिंगावरून घेऊन शिंगें झाकून घेते. विधवा स्त्रीला शिंगें बांधण्याचा अधिकार नसतो. तिनें पुनर्विवाह केल्यानंतर फिरून तिला शिंगें बांधतां येतात. बंजारा पुरुषांना मात्र शिंगें नसतात, इतकेंच नव्हे तर शिंगांच्या आकाराचें गंध देखील बंजारा लोक लावीत नाहींत, बंजारा



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पुरुष शिंगें कां बांधत नाहींत, अथवा ते प्रथमतः शिंगें बांधीत असत आणि पुढें ती प्रथा बंद झाली यासंबंधीं निश्चित माहिती मिळत नाहीं. असें असलें तरी बंजारा लोकांचें ऋचांतून वर्णन असलेल्या आर्यांच्या शत्रूशीं पुष्कळ बाबतींत साम्य आहे. त्यापैकीं साम्यदर्शक कांही गोष्टी खाली दिल्या आहेत.

( १ ) बंजारा समाज वैदिक आचाराच्या आणि चातुर्वर्ण्याच्या बाहेर आहे.

( २ ) पणींच्या समाजाप्रमाणें ते पशुपालक आणि प्रामुख्यानें व्यापारी आहेत.

( ३ ) पणीप्रमाणेच ते शाक्तपंथी आणि शिवपूजक आहेत. त्यांच्या देवधर्माचे पणींच्या देवधर्माशीं फार साम्य आहे. त्यांची मख्य आराध्य देवता देवी 'मरीमाय' आहे. ते शिवाचेहि उपासक आहेत. शिवाला ते शिवाभाया' म्हणतात. आर्यांचे शत्रू वृषभाचे पूजक होते बंजाराहि प्रामुख्यानें वृषभाचे पूजक आहेत. पणींची पशूंची पालन करणारी 'सीता' नांवाची देवता होती. आर्यांनींहि तिला आत्मसात करून तिच्या स्तुतिपर ऋचा रचल्या आहेत. ऋग्वेदांतील चौथ्या मण्डळाच्या ५७ व्या सूक्तांतील ऋचा ६ व ७ मधून 'सीता' देवीची स्तुति केली आहे. बंजाऱ्यांचीहि "हीता दीया" नांवाची पशूंचें रक्षण करणारी देवता आहे. 'हीता दीया'चें सीता देवी हें संस्कृत रूप आहे हें उघड आहे.

( ४ ) हरप्पामध्यें उत्खनीत झालेल्या खापराच्या मुद्रांपैकीं एका मुद्रेवर एकाबाजूनें डोके खालीं व पाय वर, पाय एकमेकापासून अलग असलेलें नग्न देवतेचें चित्र आहे. तिच्या गर्भाशयांतून झाड निघालेले दाखविलें आहे. दुसऱ्या बाजूस एक स्त्री बसलेली दाखविली आहे. तिचे हात प्रार्थना करतांना उंच करतात तसे आहेत. जवळच कोयत्यासारखी तलवार घेतलेला एक मनुष्य आहे. हें चित्र पृथ्विदेवतेस देत असलेल्या नरबलीचें आहे असें मानलें जातें. सिंधु संस्कृतींत नरबली दिला जात होता असा समज आहे. बंजारा जातींतहि नरबली देण्याची प्रथा अगदीं अलीकडे पावेतों होती. त्यांच्या नरबली संबंधीं माहिती त्या विषयावर लिहिणाऱ्या इंग्रज लेखकांनीं लिहून ठेवली आहे. ती येथें देण्याची जरूरी नाहीं.

( ५ ) जादुटोण्यावर व भूतपिशाचावर विश्वास असण्यांत सिंधु संस्कृतींतील लोक व बंजारा सारखेच आहेत.

( ६ ) स्त्रियांच्या वागणुकींतला मोकळेपणा दोन्ही समाजांत सारखाच असलेला दिसतो.

( ७ ) बंजारी समाज वैदिक चातुर्वर्ण्याच्या बाहेर आहे, हें वर आलेंच आहे. असें असलें तरी त्यांची स्वत:ची समाजांत उच्चनीच भावना दाखविणारी वेगळी समाजव्यवस्था आहे. ही समाजव्यवस्था त्यांच्या प्रचलित जीवनाशी बिलकुल संबंध नसलेल्या, प्राचीनकाळीं ते ज्या समाजव्यवस्थेंत होते, त्या समाजव्यवस्थेची निदर्शक आहे असें दिसून येईल. बंजारी लोकांच्या नांवाकडे पाहिलें म्हणजे त्यांच्या हल्लींच्या जीवनाशीं संबंध नसलेल्या समाजव्यवस्थेंतून त्यांचीं नांवें आलीं आहेत असें स्पष्ट दिसतें. स्थलवाचक व वस्तुनिदर्शक नांवें सोडून जीं नांवें उरतात त्यांचें निरीक्षण मनोरंजक असून त्यांतून बरीच महत्त्वाची माहिती उपलब्ध होते. बंजाऱ्यात पंडित, भंडारी, भटकाफोड, पथारिया, गुजर, गाहोई अशीं कुळांची नांवें आहेत. पंडित हें पूर्वीच्या पुजाऱ्याचें नांव असावें, भंडारी कोठावळ्या, भटकाफोड मडकीं फोडणारा– ज्यांत अन्न शिजविलें आहे तीं मडकीं दररोजच्या दररोज फोडून टाकण्याचें काम ज्याच्यावर सोपविलें आहे तो, पथारिया दगडाचें काम करणारा, गुजर गायी चारणारा, गोहाई गवई अशीं तीं तीं कामें करणाऱ्या नांवावरून नांवें आलीं आहेत. प्रस्तुत बंजारी समाजाच्या जीवनाशीं या कामांचा बिलकूल संबंध नाहीं. हल्लींचा बंजारी समाज 'तांड्यांत' गवताच्या झोपड्या बांधून राहणारा आहे. पक्कीं घरें बांधाव-









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

याचीं नाहीत व एका ठिकाणीं स्थायिक व्हावयाचें नाहीं हें त्यांचें व्रत होतें. या व्रताचा कदाचित् प्राचीन काळीं त्यांची शहरें उध्वस्त होऊन परागंदा होण्याची आपत्ति आली या गोष्टीशींहि संबंध असण्याची शक्यता आहे. त्यांच्या जीवनाशीं वरील कामांचा यत्किंचित्हि संबंध नाही. हीं नांवें ज्या समाज व्यवस्थेचीं निदर्शक आहेत तिचें व सिंधु-संस्कृतीचें फार साम्य आहे एवढेंच येथें सांगितलें म्हणजे पुरे.

(८) झाडलोट करणें, गटारें साफ करणें यासारखीं हलकीं कामें करणारांचा वेगळा वर्ग सिंधुसंस्कृतीत होता. अस्पृश्यताहि बहुतांशीं त्याचाच भाग असावा. अशीं कामें करणारांच्या नांवासारखीं नांवें बंजारी समाजांत आढळतात.

ही सामान्य स्वरूपांची माहिती झाली; परंतु याहिपेक्षां बंजारी समाजाचे आर्यपूर्व लोकांशीं संबंध दाखविणारी कांही विशिष्ट स्वरूपाची निश्चित माहिती आहे ती अशी–

( ९ ) आर्यांच्या शत्रूंचा ऋचांतून 'मृध्रवाचः' असा अनेक वेळां उल्लेख आला आहे. 'मृध्रवाचः' ( १–१७४–२; ५–२९–१०; ५–३२–८; ७–६–३; ७–१८–३ ) या शब्दाची यथार्थ कल्पना यावी म्हणून ऋचा १–१७४–२ [४] व ५–२९–१० [५] खाली उद्धृत केल्या आहेत त्यांचा अर्थ असा: "इन्द्रा तरुण पुरुकुत्सासाठीं जेव्हां तू शत्रुला ठार मारून सात शारदीय पुरें जिंकलींस व अडविलेले जलाशय मोकळे केलेस त्या वेळीं, ज्यांच्या जिव्हा हिंसित आहेत त्या प्रजेला सुखानें ठार मारलेंस १–१७४–२"

"हे इन्द्रा सूर्याच्या चाकांपैकीं एक वेगळें करून कुत्साला द्रव्य मिळून देण्यासाटीं योजिलें. ( चक्र–वेढा ). तेव्हां आस्य-रहीत दस्यूना दुर्योण शहरांत शस्त्रानें ठार मारलें, ज्यांच्या जिव्हां हिंसित होत्या त्याना संपूर्ण कापून काढलेंस. ५-२९-१०"

वरील दोन्ही ऋचांत 'मृध्रवाचः' हा शब्द आहे. 'मृध्रवाचः' यांत 'मृध्र' आणि 'वाचः' असे दोन शब्द आहेत. त्यावरील सायणाचें भाष्य 'हिंसित-वागिन्द्रियान्' ज्यांच्या जिव्हां हिंसित झाल्या आहेत त्यांना असें आहे. वरील दोन्ही ऋचांवरून आर्यांचे शत्रू कापलेल्या जिव्हां असलेले होते असें दिसतें. यांना ऋचांतून जसें 'मृध्रवाचः' संबोधिलें आहे तसेंच 'मृध्रः' ( ८-४४-३; ८-४३-२६ ) असेंहि म्हटलें आहे, 'मृध्र' याचा अर्थ हिंसीत असाच आहे. मृध्र शब्द मृध हिंसा करणें या धातूवरून आला असून त्याच अर्थी ऋचांतून त्याचा तीस वेळां उपयोग केला आहे. तेव्हां सायणाचार्यांने 'मृध्रवाचः' याचा अर्थ हिंसित–वागिन्द्रियान् असा दिला तो बरोबर आहे. वेदांचे अर्थ लावणाऱ्या पाश्चात्य आणि कांही आधुनिक भारतीय विद्वानांनी 'मृध्रवाचः' याचा अर्थ 'ज्याची वाणी स्पष्ट नाही अथवा ज्याचें बोलणें कर्णकटु आहे असा केला आहे तो बरोबर नाही. त्यांत शब्दाच्या अर्थापेक्षां शक्याशक्यतेचाच जास्त विचार केलेला दिसतो. 'मृध्रवाचः' शब्दावरून कांही आर्यपूर्व लोकांत जिभेला चिरा देण्याची अथवा त्याचसारखी इजा करण्याची दुसरी कांही चाल असावी असें दिसतें. ते असें कां करीत असावे याचा विचार येथें प्रस्तुत नाही. बंजारी लोकांचें ह्या बाबतींत ऋचांतून वर्णन असलेल्या आर्यांच्यां शत्रूंशीं फार साम्य आहे. बंजारी लोकांत विशेषतः 'मथा' बंजाऱ्यांत लहान मुलाच्या जिभेला चिरा देण्याची प्राचीन पद्धति आहे. असेंच इतर लोकाना बंजाऱ्यांत प्रवेश देतांना त्यांच्या जिभेवर तप्त सुवर्णाने 'मुद्रा' करतात. तप्त मुद्रा

---

४. दनो विश इन्द्र मृध्रवाचः सप्त यत्पुरः शर्म शारदीर्दर्त् । ऋणोरपो अनवद्यार्णा यूने वृत्रं पुरुकुत्साय रन्धीः ॥ १-१७४-२

५. प्रान्यच्चक्रमवृहः सूर्यस्य कुत्सायान्यद्वरिवो यातवेऽकः । अनासो दस्यूँरमृणो वधेन नि दुर्योण आवृणङ्मृध्रवाचः ॥ ५-२९-१०









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

करण्याच्या पद्धतीचा आणि नांवांचा उगम वैदिक 'मृध्रा' च्या पद्धतींत आणि नांवांत असण्याचा फार संभव आहे. बंजारी समाजानें प्राचीन चालीरीतींची फार काळजीपूर्वक जतन केली हे आपण त्यांच्या शिंगें धारण करण्याच्या पद्धतीवरून पाहिलें. तशीच जिभेला चिरा देण्याची अथवा तापलेल्या सोन्यानें डाग देण्याची पद्धतीहि चालू ठेवली आहे. या पद्धतीचें रसेलने वर्णन[६] केलें आहे तें असें—

" The tongue of boys were sometimes slit or branded with hot gold, this last being the ceremony of initiation into the caste still used in Nimar."

बंजारी लोकांत आर्यांच्या शत्रूंची जिभेला चिरा देण्याची पद्धतीच आहे असें नव्हे तर जिभेचा चिरा देण्याच्या पद्धतीवरून ऋचांतून वर्णन असलेले आर्यांचे शत्रू ज्या नांवानें ओळखले जात होते त्याच नांवानें बंजारी आज देखील ओळखले जातात. जीभ कापण्याच्या पद्धतीवरून आर्यांच्या शत्रूंना ऋचांतून " मृध्राः " ( ८-४३-२६;८-४४-३ ) असें संबोधिलें आहे. बंजारी लोकांच्या सर्वांत श्रेष्ठ जातीला 'मथ्रा' म्हणतात. 'मथ्रा' हा शब्द प्राचीन 'मृध्रा' या वैदिक शब्दाचें रूप आहे हें उघड आहे. जिभेला चिरा देण्याची पद्धति आणि 'मृध्रा' या नांवानें ओळखलें जाणें या दोन्ही गोष्टीवरून बंजारी लोकांचा आर्यपूर्व लोकांशीं संबंध निश्चित् सिद्ध होतो.

(१०) आर्यांच्या शत्रूंना ऋचांतून 'अही' म्हणून संबोधिलें आहे. वृत्राला 'अही' म्हटलें आहे व वृत्राच्या वंशजांनाहि अही म्हणूनच संबोधिलें आहे. अही म्हणजे नाग. 'दास' आणि 'दस्यू' हे आर्यांच्या शत्रूंचे निदर्शक शब्दहि 'अही' या अर्थीच आहेत. 'दास' आणि दस्यू यांत सेवा अभिप्रेत नसून मुळांत दंश करणें हा अर्थ अभिप्रेत आहे. आर्यांच्या शत्रूंचा निदर्शक 'अही' शब्द ऋचांतून एकूण ४८ वेळां आला आहे. 'मथ्रा' बंजाऱ्यांना 'अहीवंशी' म्हणतात. त्यासंबंधीं रसेलच्या दी कॉस्टस अॅन्ड ट्राईब्ज आफ् दी सेंट्रल प्राव्हिन्सेस या पुस्तकाच्या १७१ व्या पानावर खालीलप्रमाणें उल्लेख आढळतो.

" The Mathurias are sometimes known as Ahiwasi, ( correct Ahiwamshi ) and may be connected with Ahiwasis of the Hindusthani districts, who also drive pack-bullocks and call themselves Brahmins. "

मथ्रा बंजारी अहीवंशी आहेत. त्यामुळें त्यांचा वेदांत वर्णन असलेल्या 'अही' म्हणून संबोधिलेल्या आर्यांच्या शत्रूंशी सरळ संबंध लागतो. अहींची मुख्य खूण द्विजिव्ह असणें ही असल्यामुळें अहीवंशी लोक नागांशीं संबंध दाखविण्यासाठी जिभेला चिरा देत असणें संभवतें.

अहीशी संबंध असणें, जिभेला चिरा देणें, 'मृध्रा' या नांवानें संबोधिलें जाणें या सर्व पुराव्यावरून वेदांतून वर्णन असलेल्या, अही म्हणून संबोधिलेल्या, जिभेला चिरा देणाऱ्या, मृध्रा म्हणून ओळखल्या जाणाऱ्या आर्यांच्या प्राचीन शत्रूंशीं बंजाऱ्याचा संबंध संशयापलीकडे सिद्ध होतो.

( ११ ) दुर्योण नांवाचें तटबंदीचें शहर पुरुकुत्सानें शुष्णा जवळून जिंकून घेतलें. शुष्ण धान्याचा फार मोठा व्यापारी होता. त्याचें धान्य लुटण्यासाठीं पुरुकुत्सानें स्वारी केली. त्याचें 'शृंगिणः' म्हणजे शिंगें धारण करणारा व 'कुयवाचः' कापलेली जीभ असलेला असें वर्णन आहे. हें वर्णन ज्यांनीं आपली पांच हजार वर्षांची परंपरा कायम राखली त्या बंजाऱ्यालाहि लागू पडते.

६. Tribes and casts of the Central Provinces of India page 183




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बंजाऱ्यांच्या डोक्यावर दिसणाऱ्या शिंगाचा आर्यपूर्व लोकांच्या शिंगांशीं संबंध दाखविण्यासाठीं त्या दोन समाजांचा संबंध दाखविणें जरूर असल्या-मुळें बंजारी समाजाची वेदांतील आर्यांच्या शत्रूंशी जरा तपशीलवार तुलना करावी लागली. त्यामुळें सामाजिक जीवनाच्या निकृष्ठावस्थेंत असलेल्या, अज्ञान व दारिद्र्यांत खितपत पडलेल्या या समाजाचा भूतकाळ केवढा मोठा होता याची कांहींशी कल्पना येईल.

बंजारी समाजाच्या चालीरीतींच्या व भाषेच्या सूक्ष्म अभ्यासाने फार प्राचीन काळच्या भारतीय समाजाबद्दल माहिती मिळण्याची शक्यता बरीच आहे.

---


## नित्योपयोगी गोड औषधें

**१ डेन्‌-टॉनिक**

दांत येतांना मुलांना भारी त्रास होतो. त्यावेळीं तीन गोळ्या पाण्या-बरोबर तीन वेळां दिल्यास दांत बाहेर पडण्यास मदत होते; इतकेंच नाही तर शौचास साफ होऊन झोंपहि सुधारते. १५० गोळयास रु. १-५०.

**२ ऑन्टॉन्सिल**

ऑन्टॉन्सिलसमुळें भारी त्रास होतो; खोकला होतो; घसा धरतो; अशा वेळीं या औषधाच्या दोन गोळ्या सकाळ संध्याकाळ द्याव्या. म्हणजे आराम वाटेल. १२५ गोळयास रु. २-५०.

**३ ऑस्टाल्जिन**

लहान मुलांच्या कानाच्या तक्रारी दोन— कान दुखणें अथवा फुटणें. कित्येकदां कान फुटतो, बरा होतो, पुनः फुटतो. हें औषध रोज सकाळ, दुपार, संध्याकाळ दर वेळीं तीन गोळ्या नियमित दिल्यास कान फुटणें बंद होतें. १५० गोळयास रु. १-५०.

**४ कफ पिलस**

सर्व प्रकारचा खोकला, कफ, पडसें आणि डांग्या खोकला यासाठीं हें औषध उत्तम आहे. दर वेळीं तीन गोळ्या याप्रमाणें रोज तीन वेळां द्याव्या. १५० गोळयास रु. १=५०.

**५ टॉनिक पिलस**

प्रत्यक्ष कांहीं होत नाहीं; पण काम वा अभ्यासाचा बोजा, अपचन, अशक्तपणा वगैरेमुळें निरुत्साह वाटतो; कामाची गति मंद होते. अशा वेळीं दरवेळीं दोन याप्रमाण या गोळ्या तीन वेळां घेतल्यास फायदा होतो.

रोगी तपासण्याची वेळः— १०—३० ते ४—३०

**मिळण्याचा पत्ताः—होमिओ लॅबोरेटरी**

१७८, न्यू चर्नी रोड, राममोहन हायस्कूलजवळ **गिरगांव मुंबई ४.**










अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. म. शं. वाबगांवकर

# " प्राचीन मराठींतील लोकनाट्य " : कांही शंका

'सत्यकथे'चे जुने अंक चाळतांना ऑगस्ट ५७ च्या 'सत्यकथें'त आलेला 'प्राचीन मराठींतील लोकनाट्य' हा डॉ. ना. ग. जोशांचा लेख पाहण्यांत आला. त्यांच्या मतें " महाराष्ट्रांतील नाट्याची जातकुळी आरंभाला 'सोंगा'ची होती." आजचें मराठी नाट्य ज्या प्राचीन मराठींतील लोकनाट्यांतून उत्क्रांत झालें त्या लोकनाट्याचें स्वरूप निश्चित करण्याचा प्रयत्न त्या लेखांत केलेला आहे. 'मानसोल्लासां'त आलेला मराठी विट, या सोंगांचा बहुरूपी प्रकार असलेलें नाट, 'वासुदेवा'दि सोंगें, दशावतार, टिपऱ्या इत्यादि खेळ, धुमकुस-रूप, भांड-गोंधळ, ललित आणि तमाशा हीं प्राचीन मराठी लोकनाट्याचीं कांहीं स्वरूपें म्हणून लेखकानें सादर केलीं आहेत. व त्यांविषयींचे संतवाङ्मयांतील, शाहिरी वाङ्मयांतील व महानुभावीय ग्रंथांतील उल्लेख पुराव्यादाखल संकलितपणें पुढें मांडले आहेत.

**'रूप' म्हणजे केवळ सोंग नव्हे !**

लेखकाच्या मतें " सुप्रसिद्ध महानुभाव कवि नरेंद्र याच्या 'रुक्मिणीस्वयंवरां'त भाट किन्नरांचा भाग आला आहे. भीमक राजाच्या दरबारांत भाट वेगवेगळ्या राजांचें वर्णन गीतसरणीनें करतो व किन्नर 'रूप' करून सर्व सभेला चकित करितो ... त्याचप्रमाणें नटादिकांचें वर्णनहि त्यांत आहे. हे उल्लेख जसे संस्कृतनिष्ठ आहेत, तसेच ते प्रादेशिक परंपरांचे द्योतकहि असावेत. हे 'रूप' करणारे लोकच 'बहुरूपी' असावेत. " ... इ. वस्तुतः येथें 'रूप' म्हणजे डॉ. जोशी म्हणतात त्याप्रमाणें केवळ 'सोंग' एवढाच अर्थ नसून 'रूप' म्हणजे नाटक असा अर्थ अभिप्रेत असावा. संस्कृतांत नाटकाला 'रूपक' असाच शब्द आहे. ८ व्या शतकांतील वामनाच्या काव्यालंकार सूत्रवृत्तींत 'संदर्भेषु दशरूपकं श्रेयः' ( म्हणजे 'सर्व प्रकारच्या साहित्यांत नाटक श्रेष्ठ' ) असें सूत्र आलें आहे. नरेंद्राच्या पूर्वी म्हणजे इ. स. च्या १० व्या व ११ व्या शतकांच्या संधिकालाच्या सुमारास होऊन गेलेल्या मुंजराजसभेंतील पंडित असलेल्या धनंजयाचा 'दशरूपक' हा संस्कृत नाट्यावरील प्रसिद्ध ग्रंथ नरेंद्रासारख्या व्युत्पन्न संस्कृत पंडिताच्या अवलोकनांत आला नसेलच असेंहि म्हणवत नाहीं. शिवाय भरताच्या नाट्यशास्त्रानुसार संस्कृतांतील जो पहिला नाट्यप्रयोग इंद्रध्वजमहोत्सवप्रसंगीं 'अमृतमंथन' ह्या समवकार प्रकारच्या नाटकाचा व 'त्रिपुरदाह' या डिम प्रकाराच्या नाटकाचा केला गेला होता तो भरतमुनींच्या शिष्यांसहित मुख्यत्वें गंधर्व, किन्नर व अप्सरा यांनीच केला होता. नरेंद्र भीमकसभेंतील 'रूप' 'किन्नरा'ने केलें असें म्हणतो यांतील मर्म आतां ध्यानांत येईल. आणि महानुभाव वाङ्मयांत " हें रूप करणाऱ्यांचें वर्णन संस्कृतांतल्या वर्णनाला धरून आहे " हीहि महत्त्वाची बाब वाटते. भीमकाच्या दरबारांत कल्याणकीर्ति भाट व एक किन्नर येतो; हा किन्नर पूर्वजन्मींचा 'वेदघोष' ऋषि असतो व एका अप्सरेची संभोगयाचना नाकारल्यामुळें तिच्या शापानें किन्नरयोनींत आलेला असतो व तोच भीमक दरबारीं 'रूप' करतो ही नरेंद्राच्या 'रुक्मिणीस्वयंवरां'तील कथा मूळ भागवतांत, हरिवंशांत किंवा पद्मपुराणांतहि नाही; नरेंद्राचा








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्वत:कल्पित असा तो कथाभाग आहे हेंहि लक्ष्यांत घेतलें पाहिजे. नरेंद्रानंतरच्या इतर महानुभाव कवींच्या रचनेंत ती कथा येते. नरेंद्रानें वर्णिलेल्या ह्या 'रूपा'च्या मूळ ओव्या पाहिल्या तर —

ऐसा करिता अवस्वरू ।
रस–रंगें धाला गगन–सरोवरू ।।
मग रूप करिताय खेचरू । नाटें चतुर्विधें ।।
( रु. स्वयंवर, ओं. ३१९ )

चतुर्विध नाट्याचा व त्याच्या साह्यानें वा सहित केलेल्या रूपाचा हा उल्लेख विचारणीय वाटतो.

नवल रागासी रंगाची विनी । आणीचि रंगीं रसाची जिनीं । वेगळीचि रसीं माधौर्याची अक्षोणीं । अनुपम्य हे ।। ३४७ ।। साधु सत्यलोकां–पासुनि दिसे । सुमेद गातें आंग कैसें । रस-रंगें ब्रह्मकटाहो होतुसे । सपोत कुंकमाचा ।। ३४८ ।। अवस्वरू सरला कीन्नरनायका । कैसी स्थानी ठकली आइका । जैसि कां देवसभा आली या लोका । पायारी गगनाचां ।। ३४९ ।। ऐसें रावो सरादिसीं बोले । खेचराचें गातें अंग देखिलें । तेवीचि बोलीं रूप दाविलें । सुंदराचें ।। ३५० ।।

—यांत ३४७ व्या ओवींतील राग व 'रंग' यांची नावीन्यपूर्ण वीण ('नवल रागासी रंगाची विनी'), राग व रंग यांची कलात्म गुंफण आणि रंगांतून झालेली रसनिष्पत्ति ('आणीचि रंगीं रसाची जिनीं') म्हणजे शब्दश: रागाशीं रंगाची केलेली गुंफण रंगांतून रसाची निष्पत्ति करते, रसाला जन्म देते हें वर्णन व 'रंग' शब्दाचा प्रयोग रंगदेवता, रंगभूमि इत्यादि शब्दांतील 'रंग'च्या अर्थाचा म्हणजेच नाट्याचा, नाटकाचा द्योतक वाटतो. कारण जणु कांहीं यालोकीं देवसभाच आली असेंहि 'रूपा'चें वर्णन पुढें नरेंद्राने केलें आहे. येथें वर निर्देशिलेला इंद्रध्वजमहोत्सवप्रसंगीं देवसभेंत झालेला 'अमृतमंथन' 'त्रिपुरदाह' इत्यादि नाटकांचा प्रयोग सहजच स्मरतो. पुढें एकनाथांच्या 'रुक्मिणीस्वयंवरां'त कल्याणकीर्ति भाटाऐवजीं 'कीर्ति' ब्राह्मण एवढाच उल्लेख येतो. पण विठ्ठलाच्या रुक्मिणीस्वयंवरांत मात्र–

"कलारत्न भूमंडळीं 'कीर्ति'नामा
'नटश्रेष्ठ' आला विदर्भेंद्रधामा ।"

—भीमकाच्या दरबारांत 'कीर्ति' नांवाचा 'कलारत्न नटश्रेष्ठ' आला असें स्पष्ट म्हटलें आहे !

डॉक्टरसाहेबांनी "याशिवाय' भांड'-'भांडपुराण' याचा उल्लेखहि संतवाङ्मयांत येतो. मुळांत हा एक पुराणकथनाचा प्रकार असावा. गुजरातेंत 'माणभट' हा घागरिया पुराण सांगत असतो. उत्तर हिंदुस्थानांत याला अधिक रंगदार सोंगांचें रूप आलें असावें. 'भांडभवाई' असा उल्लेख होळकरांच्या कैफियतींत आलेला आहे. 'भांड' हा हिंदुस्थानी भांडपुराणाचा पर्याय असावा, 'भवाई' म्हणजे आज गुजरातेंत रूढ असलेला ललिताचा 'भवई' नांवाचा प्रकार असावा" असें म्हटलें आहे. संस्कृतांत नाट्यावर बसविलेल्या नाटकाला रूपक व नृत्यावर आधारलेल्या नाटकाला उपरूपक ही संज्ञा आहे. रूपक म्हणजे नाट्यमय केवळ नाटक हें रसात्मक असतें (येथें नरेंद्राच्या 'रूप'वर्णनांतील राग–रंग–रस ही श्रेणी पुन: स्मरते !) तर उपरूपक म्हणजे नृत्याधिष्ठित वा सनृत्य नाटक हें भावात्मक असतें असें 'भावप्रकाशां'त सांगितलें आहे. मला वाटतें, संस्कृतांत ह्या रूपकाचे म्हणजे नाटकाचे जे १० प्रकार मानले आहेत त्यांतील तिसरा जो 'भाण' (ज्यांत फक्त एक विटच असतो, तो चतुर आणि पंडित असतो व तो स्वत:च्या अनुभवांचें किंवा इतरांचें धूर्ततेचें चरित्र वर्णन करतो; यांत अनेक 'आकाशभाषितें' असतात. 'भाणा'चें उदाहरण द्यायचें म्हणजे 'कर्पूरचरित') ह्या 'भाणां'तून 'भांड' सिद्ध झाला असावा. म्हणजे तो एक नाट्यप्रकारच आहे. पुराणकथनप्रकार नव्हे, गुजराती 'माणभटा'चें घागरिया पुराण, हिंदुस्तानी भांड-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

पुराण आणि रंगदार सोंग हींच मुळांत संस्कृत 'भाणा' पासून आलीं असणेंहि शक्य आहे. आणि संस्कृत 'उपरूपका'चे जे १८ प्रकार मानलेले आहेत त्यांतील अठरावा जो भाणिका त्या भाणिके पासून 'भवाई' किंवा 'भवई' सिद्ध झाली असावी. 'मूळ 'भाणिकें'तील नृत्यात्मकताहि आजच्या गुजराती 'भवई' ललितांत आहेच.

### भारतीय नाट्य आणि कृष्णभक्ति

"अशाप्रकारें एकंदरीनें तारतम्यानें विचार करतां महाराष्ट्रांतील लोकनाट्य हें 'भागवत' पंथांतून आलेलें आहेसें वाटतें." असाहि अंदाज डॉक्टरसाहेबांनीं व्यक्तविला आहे. श्रीकृष्णभक्तीचा भारतीय नाट्याच्या उद्‌गमाशीं संबंध जोडणारें एक मत प्रचलित आहे. कृष्णलीलांचा प्रभाव संपूर्ण भारतवर्षांत इतका पडलेला आहे कीं त्याबद्दलचीं पदें, मेळे, नृत्यें, पाठ, पूजा, रास, लीला सर्वत्र प्रचलित आहेत. अनेक मार्गांनीं लोक या देशांत बाल-कृष्णाच्या भक्तीचा आविष्कार करतात. हरिवंशांत, पतंजलींच्या महाभाष्यांत कृष्णचरित-विषयक नाटकाचे प्रयोग झाले ( पहा– 'ये तावदेते शोभनिका नामैते प्रत्यक्षं कंसं घातयन्ति, प्रत्यक्षं च बलिं बन्धयन्ति इति चित्रेषु कथम् ? ...... अतश्च सतो व्यामिश्रा हि दृश्यन्ते । केचित् कंसभक्ता भवन्ति केचिद् वासुदेवभक्ताः । वर्णान्यत्वं खल्वपि पुष्यन्ति । केचिद् कालमुखा भवन्ति केचिद् रक्तमुखाः ।" – पातंजल महाभाष्य. या उताऱ्यांत 'कंसवध' व 'बलिबंधन' या दोन नाटकांच्या प्रयोगाचे उल्लेख आहेत. शिवाय – 'तद्यथा नटानां स्त्रियो रङ्गं गता यो यः पृच्छति कस्य यूयं कस्य यूयमिति तं तं तव तवेत्याहुः । एवं व्यञ्जनान्यपि यस्य यस्याचः कार्यमुच्यते तं तं भजन्ते । –पातंजलमहाभाष्य. यांतील नट, रंग इत्यादि शब्दांचे नाट्यविषयक स्पष्ट उल्लेख व अर्थ पाहतां नरेंद्राचा 'रंग' व विठ्ठलाचा 'नटश्रेष्ठ' यांचाहि नाट्यविषयक अर्थ करण्यास प्रत्यवाय असूं नये.) असे उल्लेख येतात. श्रीकृष्णाची जन्मभूमि व लीलाभूमि शूरसेन देश होय आणि संस्कृत नाटकांत शौरसेनी प्राकृताचा उपयोग करतात. अशाच स्वरूपाचे आणखीहि कांहीं मुद्दे दिसतात कीं ज्यामुळें भारतीय नाट्य कृष्णभक्तींतून जन्मलें आहे कीं काय अशी सबळ शंका घेतां येते. व कांहींनीं तशी ती घेतलीहि. पण एक तर भारतीय नाट्यांतील ज्या गोष्टीचा संबंध कृष्णभक्तीशीं जोडतां येतो आणि जोडला जातो त्या सर्व पूर्वीपासूनच चालत आलेल्या आहेत. आणि जसा कृष्णभक्तीचा प्रभाव या देशांत सर्वत्र आहे तसा रामभक्ति, रुद्र-शिवभक्ति यांचाहि आहे. मग त्यांचाहि भारतीय नाट्याच्या उद्‌गमाशीं संबंध कां जोडूं नये ?

### लोकनाट्याचा जन्म शुद्ध लौकिक–

"महाराष्ट्रांतील लोकनाट्य हें 'भागवत' पंथांतून आलेलें आहे. ...... कृष्णजन्माच्या उत्सवांत या तऱ्हेच्या मनोरंजनाला भर येत असणें स्वाभाविक होतें. ... श्रीकृष्ण चरित्रांतील नाट्यात्मक प्रसंगांच्या अनुषंगानेच राधेच्या आवर्तीभोवर्ती कमी–अधिक शृंगारिक गीतें व नृत्य यांची सजावट झाली असावी... वर उल्लेखिलेल्या योषितासुद्धां 'राधा' होत असतील व त्या याच तऱ्हेचीं गीतें गात असतील; त्यावेळीं सोंगेंहि कृष्णावतारांतील प्रसंगांना धरून येत असतील. ... राधाकृष्णांच्या नाट्यमय क्रीडेचा उल्लेख रामजोशी व अनंतफंदी यांच्या कवनांत आढळतो ... 'होरी खेळतो हरी करुनि राधा नट आपण नटी ॥' तमाशांत कृष्णाच्या होरीचा रंग विशेष आढळतो. अशाप्रकारें अतिप्राचीन काळापासून कृष्णभक्तीशीं संबद्ध असलेल्या या गोंधळ-सदृश प्रकारांचें रूपांतर शाहिरी तमाशांत झालें." व भागवत पंथ व कृष्णभक्ति यांतून मराठी लोकनाट्य जन्मलें असें डॉ. जोशांचें म्हणणें आहे.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लोकनाट्याच्या कांहीं प्रकारांतून कृष्णलीलांचें, राधाकृष्णविलासितांचें प्रतिबिंब येतें हें खरें. पण तेवढ्यारून कृष्णभक्तींतून व भागवतपंथांतून मराठीनाट्य जन्मलें असें म्हणणें धाडसाचेंच ठरेल. एकतर राधेची जन्मकुळीच मूळ महाराष्ट्रीय आहे. म्हणजे असें की मूळ महाभारत, हरिवंश, भागवत यांतून राधेचा उल्लेख वा नामनिर्देश चुकूनहि कोठें येत नाहीं. भागवतांत 'अनयाराधितम्' असें एक पद आलें आहे व त्यावरून राधा व तिचा पति अनया आणि राधा व बाळकृष्ण यांचा विलास, लैंगिक संबंध इत्यादि संबंधींच भारूड हरदास, पुराणिकांनी रचलेलें दिसतें. राधेचा पहिला उल्लेख हालसातवाहनाच्या प्राकृत गाथासप्तशतींत येतो. व तोहि शृंगारिक संदर्भात. हालाची गाथासप्तशती हा महाराष्ट्रांत घडलेला व इसवी सनाच्या पूर्वीच्या तिसऱ्या चवथ्या शतकांतील महाराष्ट्राचें जीवन चित्रिणारा ग्रंथ आहे. नंतर पद्मपुराणांत व ब्रह्मवैवर्तपुराणांत राधा येते. इ. स. च्या चवथ्या, पांचव्या इत्यादि शतकांतील देवगिरि, मंदसोर इत्यादि स्थळांपासच्या कांहीं शिलालेखांतून कृष्णप्रिया राधेचा उल्लेख येतो. आणि मग जयदेव, विद्यापति, चंडीदास इत्यादिकांनी तिला मधुराभक्तीची अधिदेवताच बनवून टाकलें आहे. पण राधाकृष्णलीलांचे हे संदर्भ केवळ लोकनाटयापुरतेच मर्यादित नाहींत. एकनाथांच्या अनेक अभंगांतून, त्यांच्याच 'राधाविलास' काव्यांतून, वामनपंडिताच्या 'राधाविलास' व अन्य कवींच्या 'चंद्रावळी आख्यान' इत्यादि अनेक काव्यांतून राधाकृष्णांच्या रतिविलासांचीं उत्तान, अश्लील, ओंगळ वर्णनें प्राचुर्याने आलेलीं आहेतच. संतवाङ्मयांतून ह्याचे हवेतेवढे उल्लेख हात घालावा तेथें गवसतात. पण कृष्णराधा चरित्राचीं हीं सर्व आख्यानें व तत्संबद्ध लोकनाटयांतील संदर्भ मधुराभक्तीच्या संप्रदायाच्या महाराष्ट्रांतील लोकजीवनावरील प्रभावाच्या निदर्शक अशा खुणा होत. गोंधळ, तमाशादि लोकनाटय ह्या राधाकृष्ण प्रसंगांतून व कृष्णभक्तींतून जन्मलें असें त्यावरून सिद्ध होत नाहीं. कृष्णलीले इतक्याच प्राचुर्यावे व प्रभावशालित्वाने रामलीलाहि लोकनाटयाचें एक महत्त्वपूर्ण अंग म्हणून या देशाच्या फार मोठ्या भागांत पुरातनकालापासून परंपरेने चालत आलेल्या व रूढ दिसतात, त्याचें काय? रामभक्तीचा फार मोठा प्रभाव संस्कृत नाटयावर दिसतो; आणि संस्कृतांत अभिषेक, प्रतिमा, महावीर चरितम्, उत्तररामचरित्, कुन्दमाला, अनर्घराघव, हनुमन्नाटक, बालरामायण, आश्चर्यचूडामणि, प्रसन्नराघव, जानकी परिणयम् इत्यादि इ. स. पूर्वीच्या ४ थ्या शतकांतील भासापासून तों 'राधा व हरीच्या होरीचें कवन गाणाऱ्या' रामजोशांच्या समकालीन असलेल्या १८ व्या शतकांतील रामभद्र दीक्षितांपर्यंत रामकथेंतून जन्मलेल्या संस्कृतांतील बव्हंश व श्रेष्ठ नाटकांची एक अविच्छिन्न परंपराच दृष्टीस पडते; पण म्हणून रामभक्तींतून संस्कृत नाटय जन्मलें असें म्हणावयाचें की काय? तात्पर्य, भरतमुनींच्या शब्दांत सांगायचें तर—

'दुःखार्तानां समर्थानां शोकार्तानां तपस्विनाम्
विश्रान्तिजननं काले नाटयमेतन् मया कृतम् ॥'

हेंच अधिक खरें आहे. मराठी लोकनाटयांतील राधाकृष्णादिकांचीं सोंगें वगैरे सर्व भाग आनुषंगिक आहे. एरव्हीं, त्या लोकनाटयाचा जन्म शुद्ध लौकिक आहे. बहुजनसमाजाचें साधें मनोरंजन करण्याच्या उपक्रमांतच त्याचा उगम आहे. कुठल्याहि धर्ममतांत वा पंथांत नव्हे. एरव्हीं, विदूषक, विट किंवा सोंगाड्या या शुद्ध लौकिक बाबींची उपपत्ति 'भागवत' पंथाशीं कशी जोडणार? एकनाथांच्याच वाङ्मयाचें उदाहरण घेतलें तर असें दिसतें कीं—

'वारियाने कुंडल हाले। डोळे मोडित राधा चाले'

ही नाथांची 'राधा', त्यांचे विरह, गौळणी, जोहार, 'अंगाई गीत', कुत्रा व माणूस यांचा



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संवाद, बैल व माणूस यांचा नाट्यानुकूल संवाद, ब्राह्मण व महार यांचा संवाद किंवा शिद्दी, नानक, डोंबारी, गारुडी, देवऋषि, गोंधळी, बाळसंतोष, फकीर, कुडबुड्या जोशी, मुंढा, बाजेगर (जादुगार) दिवटा, डुगडुग्या, वैदु, सरोदा, पांगुळ, मुका, बहिरा, मानभाव, चोपदार, दरवेशी, कैकाय, भांड, मांग, भटीण, महारीण, कंजारीण, कोल्हाटीण, बागुल, जंगम, वासुदेव इत्यादि समाजाच्या भिन्न थरांवरील सर्व लोकांच्या जीवनाशीं संबंधित, परिचित वा त्यांच्या करमणुकीचे हे सर्व प्रकार पूर्वीचेच होते. नाथांनीं व नाथपूर्व व नाथोत्तर संतांनी त्यांचें परिष्करण, शुद्धीकरण केलें. त्यांना अध्यात्माची जोड दिली व भक्तिभावनेच्या आविष्कारासाठी व सार्वत्रिक प्रचारासाठी त्यांना राबवून घेतलें. लोकनाट्यांतील ह्या सोंगांची व प्रकारांची भक्तीशीं, भागवत पंथाशीं अशी ही सांधेजोड मागाहून झाली. त्यांचा उगम मात्र मानवी स्वभावांतील सहजात नाट्यप्रिवृत्तींतून व समाजाच्या मनोरंजनाच्या गरजेंतून आहे. ह्या देशांतील अन्यप्रांत व अन्य भाषा ह्यांतील लोकनाट्याच्या संबंधानेहि थोड्या फार फरकानें हेंच खरें आहे. ह्या प्रांतांत व अन्य प्रांतांत जंगलें, दऱ्याखोरीं यांतून राहणारे जे आदिवासी गिरिजन, वन्य जमाती त्यांच्यांतील लोकनाट्य, लोकनृत्य, लोकगीतें आदि प्रकारांची उत्पत्ति कोणत्या धर्मपंथापासून लावावयाची ?

मराठींत ज्याप्रमाणे ललित, वासुदेव, दशावतार खेळिया, टिपऱ्या एवंस्वरूप लोकनाट्यप्रकारांतून नाट्यवाङ्मय विकसित झालें त्याप्रमाणें संस्कृत नाट्याचाहि उद्‌गम आणि विकास लोकनाट्यसदृश अशा कांहीं खेळांतून झाला असावा. संस्कृत नाटकांत 'सूत्रधार' व 'स्थापक' असतात. सूत्रधार म्हणजे दोरे धरणारा आणि स्थापक म्हणजे मांडणारा. या आणि इतर पुराव्याच्या आधारें भारतीय नाट्याचा उगम लांकडी बाहुल्यांच्या खेळांतून झाला असा सिद्धान्त डॉ. पिशेलने मांडला आहे. नाटक या अर्थी संस्कृत साहित्यशास्त्रांत रूढ असलेल्या 'रूपक' शब्दाची चर्चा करतांना कीथनेहि काव्याचें दृश्य स्वरूपांत आविष्करण, पुत्रिकानृत्य असाच त्याचा अर्थ केला आहे. पुत्रिका, पाञ्चालिका, पुत्तलिका, दारुमयी, योषा हे सर्व लाकडी बाहुल्यांचेच संस्कृतांतील पर्याय आहेत. त्यांना दोरे बांधून, रंगमंचावर ठेवून त्यांच्याकडून खेळ करवीत असत. महाराष्ट्रांत त्याला यमपुरीचा अथवा कळसूत्री बाहुल्यांचा खेळ म्हणतात. अजूनहि असे खेळ होतांना दिसतात. आणि हे कळसूत्री बाहुल्याचे खेळ करून उपजीविका करणारे लोक महाराष्ट्रांत अजूनहि आहेत. उत्तर प्रांतांतहि 'कठपुतली' म्हणजे काष्ठ पुत्तलिकेचा हा खेळ अजून परंपरेने टिकविला आहे. सूत्रधार व स्थापक हे नाटकांतील शब्द प्राचीन काळच्या या प्रकारच्या खेळाचें अस्तित्व व नाटकाचें या खेळप्रकारांत असलेलें मूळ दाखवितात. संस्कृत नाटकांत आरंभीं 'सूत्रधार' येतो; 'स्थापक', 'स्थापना' ह्या गोष्टीहि येतात. अर्थात् पुत्तलिकानृत्याचा नाटकाशीं असलेला संबंध उघडच आहे. पण केवळ मराठी नाट्यवाङ्मयाचा उद्‌गम आणि विकास पाहतां देखील आजच्या मराठी नाट्याची मूलावस्था डॉ. जोशांनी दर्शविलेल्या धुमकुस, धुमाळी, नाट, वासुदेव, दशावतार, भांड, ललित, टिपरी एवंविध प्राचीन मराठीं लोकनाट्याच्याहि आधींच्या ह्या कठपुतलीच्या खेळांत असावी असें निश्चित वाटतें. प्रथम ही कलसूत्री बाहुल्यांच्या खेळाची अवस्था, नंतर धुमकुस, धुमाळी, वासुदेव, नाट, दशावतार, भांड, ललित, तमाशा इत्यादि लोकनाट्याची अवस्था व नंतर आजची रंगभूमि व नाट्यवाङ्मय असे हे टप्पे वाटतात. 'दशरूपक'कार धनंजयाच्या थोडें पूर्वी १० व्या शतकाच्या पहिल्या चरणांत होऊन गेलेल्या राजशेखराच्या 'बालरामायण' नाटकांत पुत्तलिका-नृत्याचा महत्त्वपूर्ण उल्लेख येतो.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हा यायावरीय राजशेखर महाराष्ट्रीय होता (कारण ह्याच 'बालरामायण' नाटकांत 'महाराष्ट्र चूडामणि' अकालजलदापासून आपण चवथा पुरुष असल्याचें त्याने स्वतःच सांगितलें आहे. याच्या 'काव्यमीमांसे'च्या ३ ऱ्या अध्यायांत काव्यपुरुष व साहित्यविद्यावधू यांचा वत्सगुल्म नगरांत विवाह झाल्याचें वर्णन आहे. हें वत्सगुल्म म्हणजेच वऱ्हाडांतलें म्हणजे महाराष्ट्रांतलें वाशीम. ह्याच्या आईचें नांव 'शीलवती' हेंहि एका प्रसिद्ध महाराष्ट्रीकृत विदुषीच्या नांवाचें स्मरण करून देतें! आणि याची बायको अवन्तिसुंदरी ही 'चाहुआण' कुलज क्षत्रियकन्या म्हणजे 'चव्हाण' कुळांतली मराठा होती!) हें नीट ध्यानांत घेतलें म्हणजे इ. स. च्या ९ व्या, १० शतकांत मराठी नाटकाचें मूळ असलेला हा कळसूत्री बाहुल्यांचा, पुत्तलिका नृत्याचा खेळ महाराष्ट्रांत प्रचलित होता हें सिद्ध होतें. ज्ञानेश्वरकाळांतहि या खेळाचें महाराष्ट्रांतील अस्तित्व आणि स्वरूप ज्ञानेश्वरींतील एतद्विषयक उल्लेखांवरून सहजच अनुमित होतें. उदाहरणार्थ, ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायांत —

परि आतां आमुतें गोडां करावें।
ऐसें हें तांदुळीं कासया विनवावें।
साइ खेडेनि कां प्रार्थावें। सूत्रधारातें॥

(अ. ९., ओ. ३०)

('आम्हांला चांगलें नाचव' अशी त्या कळसूत्री बाहुल्यांना सूत्रधारानी मुद्दाम प्रार्थना करावी लागते काय? अशा अर्थात) ह्या खेळाचें वर्णन येतें. साइखेड किंवा साइखडें ह्याची 'स्वामिखेलक' पासून राजवाड्यांनी व्युत्पत्ति दिली आहे. आणि येथे येणारा नाट्यविषयक 'सूत्रधार' हा शब्दहि लक्षणीय आहे. पुढे —

तो काइ बाहुलियांचिया काजा नाचवी।
कीं आपुलिये जाणिवेची कला वाढवी।
म्हणौनि आम्हां या ठेवाठेवी। काइ काज॥

(अ. ९, ओ. ३१)

(तो सूत्रधार बाहुल्यांच्या कामासाठी वा हितासाठी त्यांना नाचवितो काय? नाही; तर तो आपल्या नाचविण्याच्या कलेचें, कौशल्याचें प्रमाण वाढविण्यासाठीं, आपल्या ज्ञानाचें चातुर्य दर्शविण्यासाठीं त्यांना नाचवितो) असें वर्णन आलें आहे. अठराव्या अध्यायांत देखील —

सायिखडेयाचें बाहुलें। चालविल्या सूत्राचेनि चाले।
तैसा मातें दावित बोलें। स्वामी तो माझा॥

(अ. १८, ओ. १७६८)

— असा उल्लेख आला आहे. तात्पर्य, मराठी नाट्याची वासुदेव, दशावतार, ललित, नाट, धुमकुस, धुमाळी, तमाशा या लोकनाट्याच्याहि पूर्वीची अवस्था म्हणजे हें पुत्तलिकानृत्य, साइखडें, हा कळसूत्री बाहुल्यांचा खेळ ही असावी असें दिसतें.

---


**मानवाचा आदर्श**

किं. तीन रुपये (ट. खर्च निराळा)

लेखक

**श्रीमती एलन रॉय**

**शिवनारायण रे**

अनुवादक– प्रा. गोवर्धन पारीख

विशेष माहितीसाठीं लिहा

**प्राज्ञपाठशाला मंडळ, वाई जि. सातारा**




अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. ग. मो. पाटील

# " बोली "

भाषा हें मानवांच्या सामूहिक जीवनाचें अत्यंत आवश्यक आणि प्रधान अंग आहे. मनुष्याच्या भावना-विचार व्यक्त करण्याचें ( क्वचित् प्रसंगीं छपविण्याचें पण ! ) भाषा हें महत्त्वाचें साधन आहे. भाषेशिवाय समाज ही केवळ अतर्क्य घटना आहे. एक वेळ अन्न, वस्त्र, आसरा आणि सुखी अन् समृद्ध जीवनाचीं प्रगत साधनें अन् यंत्रोपकरणें नसलीं तर एखादा समूह टिकूं शकेल, पण भाषेशिवाय मानवी समाजच होऊं शकत नाहीं. आणि स्थल-काल-व्यवसायानुरूप जितके समाज—समूह तितक्या त्यांच्या भाषा असणें ही अपरिहार्य वस्तुस्थिति आहे. पण अशा अनेकविध भाषांमध्यें श्रेष्ठ कनिष्ठतेचा दर्जा ठरविण्याचा अशास्त्रीय प्रयत्न करण्यांत येतो त्यावेळीं आश्चर्य वाटतें. जातिनिविष्ट भाषा अगर बोली ( Dialects ) बद्दलसुद्धां अशाच अनेक कल्पना प्रसृत असल्याचें पुष्कळदां आढळतें. बोलभाषा ही ( १ ) हेंगाडी आहे, ( २ ) ती अशुद्ध आहे, ( ३ ) तें शुद्ध भाषेचें विकृत स्वरूप आहे, आणि ( ४ ) ती मागासलेपणाची खूण आहे; असे विचार अनेकदां सुशिक्षित आणि सुसंस्कृत अधिकारी व्यक्तींकडूनपण प्रगट करण्यांत येतात. सदर बोलीचा वापर करणाऱ्या व मागासला ( ! ) समजला गेलेल्या समाजांतील एखादी व्यक्ति दैवयोगानें ( आणि क्वचित् कर्तबगारीनें पण ! ) श्रीमंत होते अगर उच्चपदावर स्थानापन्न होते आणि भोंवतालच्या इतर समाजांत मानाई ठरते तेव्हां तर अशा व्यक्तीचा आपल्या आईबापांच्या आणि इतर नातेवाइकांच्या मूळ बोलभाषेबद्दलचा न्यूनगंड शिगेस पोहोंचतो. ती भाषा आपली नव्हेच, त्या बोलभाषेशीं जणूं कांहीं आपला कांहीं संबंध नव्हे अशा तिरस्कारानें ती व्यक्ति वागते. बोलभाषा इतक्या त्याज्य आणि तिरस्करणीय आहेत कीं काय या दृष्टीनें या विषयाचें किंचित् परीक्षण खालीं केलें आहे.

## बोली आणि प्रमाण-भाषा

बोलभाषांचें ऐतिहासिक स्थान, शास्त्रीय स्वरूप आणि घटना यांबद्दल स्पष्ट कल्पना नसल्यामुळें अनेकवेळां गैरसमज निर्माण होतात ही गोष्ट प्रथमच ध्यानांत घ्यावी लागेल. भाषांच्या ऐतिहासिक परिणतीकडे थोडें अधिक लक्ष दिल्यास आपले विचार सुस्पष्ट आणि सखोल होतील. संस्कृत आणि प्राकृत भाषांचा इतिहास या दृष्टीनें उद्बोधक ठरतो. या दोन भाषांचीं नांवेंच—" संस्कृत " आणि " प्राकृत "—आपणांस असें दाखवितात कीं, यांतील पहिली ही घासूनपुसून तयार केलेली व म्हणून कृत्रिम आहे ( सम् + √कृ-संस्करणात् संस्कृतमुच्यते । ); तर दुसरी ही मौलिक आणि नैसर्गिक आहे (प्राक् कृतम् अथवा प्रकृत्या सिद्धम् अथवा प्रकृतीनां इदम् ). धर्मप्रधान समाजांत सामान्य जनतेवर धार्मिक वर्चस्व गाजविणाऱ्या आणि म्हणून सांस्कृतिक दृष्ट्या प्रगत आणि वंद्य ठरलेल्या समाजाची ग्रांथिक भाषा ही श्रेष्ठ आणि आदर्श मानली गेली आणि इतरांनीं तिला मान्यता दिली. साहजिकच इतर समूहांची दैनंदिन जीवनांतील बोलभाषा वाङ्मयदृष्ट्या मागासलेली ठरली. पण ज्यावेळीं समाजाच्या रूढ विचारांना धक्के देऊन आणि पारंपरिक मतप्रणाली नष्ट करून स्वतःची मतप्रणाली समाजावर लादणारे आणि दृढमूल करणारे महावीर जैन आणि गौतम बुद्धा-









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सारखे असामान्य बुद्धिमत्तेचे आणि अद्वितीय प्रतिभेचे थोर महात्मे उत्पन्न झाले त्यावेळीं त्याच अर्धमागधी आणि पाली भाषांनां पुन्हां वाङ्मयीन प्रतिष्ठा प्राप्त झाली. तरीहि संस्कृत भाषेची पकड संपूर्णतः नष्ट झाली नाहींच, आणि म्हणून अश्वघोषासारख्या महाकवीनें बुद्धचरित्र लिहिलें तें पुनः संस्कृतांतच ! " चळी तो कान पिळी " हा इतिहासाचा सिद्धांत भाषेच्या बाबतींतपण तितकाच प्रभावी ठरला आहे. मग हें बळ सत्तेचें असो, संपत्तीचें असो अगर सांस्कृतिक प्रभुत्वाचें असो. ' शुद्ध ', शिष्टसंमत आणि प्रमाणित ( Standard ) भाषांच्या बाबतींत इतिहासाचा हाच निर्णय आहे. एखादी भाषा प्रमाणित म्हणून मान्यता पावण्यापूर्वी तीपण इतर बोलींप्रमाणेंच एखाद्या विशिष्ट समाजाची अगर प्रदेशाची बोलीच असते. त्या सर्व बोलींमध्यें समानता असते, उच्चनीचपणाचा अभाव असतो. मध्ययुगीन कालांत इंग्लंडमध्यें ईशान्येकडची, स्कॉटलंडची आणि दक्षिणेकडची अशा प्रत्येकी विभागनिविष्ट बोली ( Regional Dialects ) होत्या व त्यांचा वापर लोक सर्राहा सारख्याच मान्यतेनें आणि गौरवानें करीत असत. परंतु नंतर इतिहास बदलला, एका भागाची बोली प्रमाण-भाषा ठरून इतर बोली म्हणून हीन व अशिष्ट ( slang ) मानल्या जाऊं लागल्या. महाराष्ट्रांत मराठ्यांचें राज्य प्रस्थापित होण्यापूर्वीची मराठी भाषा, पेशवेकालीन मराठी भाषा आणि आंग्लकालीन मराठी भाषा यांचा तौलनिक अभ्यास भाषेवरील राजसत्तेचें वर्चस्वच स्पष्ट करतो. मुसलमानी राजवटींत राज्यकर्त्यांची दरबारची आणि व्यवहाराची म्हणून प्रतिष्ठा पावलेली फारशी भाषा शिकून तीवरील प्रभुत्वामुळें नोकरी मिळविणारे ' पारसनीस " ( फारशी+नवीस = लेखक ) ब्राह्मणांतसुद्धां झाले आणि भाषेंत बहुसंख्य फारसी-अरबी शब्दांचा भरणा झाला. पेशवाईंत आणि तदनंतरहि पुण्यांतील पुढारलेल्या व अधिकारावरील ब्राह्मणांची भाषा शिष्टसंमत भाषा म्हणून मान्यता पावली. इंग्रजी अंमलाखालीं व स्वातंत्र्याचें वारें भारतांत स्वैरपणें संचारूं लागल्यास एक तप पूर्ण होत आलें तरी अद्यापहि इंग्रजी भाषेचा वापर करण्यांत आणि रोजच्या व्यवहार भाषेंतहि अधिकांश इंग्रजी शब्दांचा भरपूर उपयोग करण्यांत भूषण मानणारे हरीचे लाल थोडेथोडके नाहींत. शिष्टसंमत भाषापण वारंवार बदलत असते हाच याचा इत्यर्थ ! प्रमाणित शिष्ट भाषा स्वीकाराई असली तरी वास्तवतेच्या दृष्टीनें बोलींचा वापर करणें लांच्छनास्पद मानलें गेलें नव्हतें हें काव्यखंडांतील संस्कृत नाटकांतील प्राकृत भाषेवरून दिसून येईल. उच्च कुलांतील अथवा उच्च संस्कृतीच्या असल्या तरी शाकुंतलांतील गौतमी, प्रियदर्शिकेंतील सांकृत्यायनी, मालतीमाधवांतील कामंदकी, सौदामिनी, कपालकुण्डला आणि उत्तररामचरितांतील वासंती, अरुन्धती वगैरे स्त्रियांखेरीज कण्वाश्रमांतील शकुन्तला, स्वर्गांतील रंभा अन् उर्वशी, वसन्तसेना, वासवदत्ता, रत्नावली, प्रियदर्शिका वगैरे सर्व नायिका व इतर सर्व स्त्रिया प्राकृतांतच बोलत असतात. शकारासारखें 'श'प्रधान प्रादेशिक बोली बोलणारें एखादें पात्र सोडलें तर वसन्तक-विदूषकासारख्या ब्राह्मणांचीपण– भले ते ब्रह्मबंधू असोत ! – रोजची व्यवहाराची भाषा प्राकृतच होती. किंबहुना संस्कृत ही कृत्रिम आणि प्रतिष्ठितपणाच्या कल्पनेमुळें बाह्यतः वापरली जाणारी ग्रांथिक दुय्यम भाषा ( Literary Second Language ) होती. परंतु दैनंदिन व्यवहारांत राजा, प्रधान, सेनापति आणि इतरेजन " मातृभाषा " म्हणून एखादी बोलभाषाच वापरीत असावेत अशी दाट शंका येते. या शंकेला बळकट पुरावा म्हणजे विक्रमोर्वशीय नाटकाच्या चौथ्या अंकांत प्राकृतांत बोलणारा आणि गाणारा नाटकाचा नायक राजा पुरूरवा ! उर्वशीच्या विरहानें भ्रमिष्ट होऊन जेव्हां पुरुरवा राजेपणाचें कृत्रिम दडपण







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विसरतो तेव्हां तो प्रतिष्ठितांची कृत्रिम भाषा सोडून स्वतःच्या नैसर्गिक मातृभाषेंतच- प्राकृतांतच- बोलतो हे सत्य आहे. किंबहुना शाकुन्तलांतील भरत मारीच ऋषीच्या आश्रमांत लहानपणापासून राहूनसुद्धां बोबडें पण संस्कृत बोलण्याऐवजीं प्राकृतांतच बोलतांना कालिदासानें दाखविला आहे. अर्थात् नाटकांतील वापरावरून प्राकृतालापण वाङ्मयीन मान्यता होतीच हें स्पष्ट आहे. भाषा या दृष्टीनें सर्वच बोली महत्त्वाच्या आणि गौरवास्पद असून तत्कालीन बाह्य कारणांमुळें त्यांतील एखादी प्रमाणित व वाङ्मयीन भाषा ठरते हें वरील विवेचनावरून सिद्ध होईलच. संदर प्रमाणित भाषा भोंवतालच्या इतर बोलींतून आणि परभाषांतून शब्दांची आणि वाक्प्रचारांची उसनवारी करून अधिकाधिक पुष्ट आणि संपन्न होते व म्हणून रोजच्या व्यवहाराला अन् वाङ्मयनिर्मितीला सुकर बनते. संस्कृतच्या शब्दभांडारांत असे अनेक शब्द दिसतात. आजच्या प्रमाणित मराठींत पण, काटेकोर पृथक्करण केल्यास, लोहार, सोनार, सुतार, गवंडी, शेतकरी व इतर भिन्न व्यवसायिकांच्या बोलींतून घेतलेले अनेक शब्द आढळतील. मुलामा देणें, पाचर मारणें, उकडहंडी वगैरे अनेक शब्दप्रयोगांचा मूळ अर्थ लोप पावून ते पुष्कळदां लक्ष्यार्थानेंच वावरत असतात इतके ते एकजीव होऊन जातात. परभाषेंतून आलेल्या तत्सम आणि अनुवादित शब्दांमुळेपण भाषा समृद्ध झाली आहे; आणि तिला विचारप्रदर्शनाचें एक अनोखें सौंदर्य प्राप्त झालें आहे.

### बोली हेंगाडी हा आरोप अशास्त्रीय

बोलभाषा ही हेंगाडी असते व त्यासाठीं ती त्याज्य समजली पाहिजे या आक्षेपांत खरोखर कांहींच अर्थ नाहीं. स्वतःची आई वर्णानें काळी असली म्हणून दुसऱ्या सुंदर स्त्रीला कोणी आई म्हणत नाहीं हें जितकें खरें तितकेंच एखादी बोली इतरांच्या तुलनेनें हेंगाडी वाटते या मुद्यालापण महत्त्व नाहीं. कानडी भाषेची थट्टा भावबंधनांत कै. गडकऱ्यांनीं केली म्हणून ती भाषा कमी प्रतीची अगर त्याज्य कोणीच भाषाभ्यासी मानीत नाहीं अगर मानणार नाहीं. फ्रेंच भाषेच्या तुलनेनें विचार केला तर कदाचित् "शुद्ध" मराठीपण तितकीच हेंगाडी ठरण्याचा संभव आहे. खुद्द मराठी भाषेचें निरनिराळया कालांतील ग्रांथिक स्वरूप पाहिलें तर या मुद्याबाबत उजवें-डावें ठरविणें कठीण जाईल. महत्त्वाचा मुद्दा असा आहे कीं, भाषेच्या स्वर-व्यंजन प्रक्रियेमुळें ( Phonetics ) तिचें स्वरूप आणि उच्चार ठरतात. ऐतिहासिक कारणामुळें अगर इतर बाह्य परिणामांमुळें एखाद्या भाषेची वर्ण-प्रक्रिया दुसऱ्या भाषेपेक्षां निराळी दिसली तर त्यामुळें ती भाषा त्याज्य अगर स्वीकारार्ह ठरविणें अशास्त्रीय आहे. गुजराथी भाषेंतील 'ऋ' स्वराच्या लोपामुळें 'कृष्ण'; 'क्रष्ण'चा 'कृपा'चा 'क्रपा'; 'दृढ' चा 'द्रढ' असा उच्चार होतो यांत वावगें तें काय ? फारशी-अरबी भाषांतील कण्ठमूल क़ वर्ग मराठींत नसल्यामुळें मूळच्या 'क़लम'चें आपण 'कलम' केलें आणि 'ग़रीब'ला 'गरीब' बनविलें. मराठीनें इंग्रजीचा 'ऑ' आत्मसात् केल्यामुळें कॉलेज्, हॉल् वगैरे शब्दोच्चार शक्य झाले, परंतु गुजराथीनें तसें न करतां जवळचाच 'ओ' वापरला व त्यामुळें सुसंस्कृत, उच्चपदस्थ आणि अधिकारी अशा गुर्जरभाषिकांकडून कोलेज्, होल् वगैरे शब्दोच्चार आजहि ऐकावयास मिळतात. प्रत्येक बोलीची पण अशीच वर्णप्रक्रिया ऐतिहासिक कारणांमुळें निश्चित झालेली असते व म्हणून बोली हेंगाडी असते हा आरोप अशास्त्रीय अन् विचारबाह्य आहे.

### बोलीस स्वतःचें व्याकरण असतें

बोली अशुद्ध असते या आक्षेपाचें निरसन करण्यापूर्वी "शुद्ध" आणि "अशुद्ध" या संज्ञांचा स्पष्ट आणि शास्त्रीय बोध करून घेतला पाहिजे. ज्या त्या भाषेचें तिचें स्वतःचें त्या त्या कालानुसार





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रमाणित व्याकरण असतें आणि त्याप्रमाणें लिंगवचनादि भेद, क्रियापद-नामांचीं रूपें आणि वाक्यप्रयोग होत असतात. प्रत्येक बोलीचेंपण असें स्वतंत्र व्याकरण असतें याची पुष्कळांस कल्पनाहि नसते; आणि त्यामुळें प्रतिष्ठित भाषेच्या व्याकरणाचा दण्ड वापरून बोलभाषेस अशुद्ध ठरविण्याचा अशास्त्रीय प्रयत्न केला जातो. तत्कालीन व्याकरणाच्या नियमांस अनुसरून बोलली अगर लिहिली जाणारी भाषा शुद्ध व तद्व्यतिरिक्त भाषा अशुद्ध हा सिद्धान्त मान्य होण्यास विरोध असूं नये. हें तत्त्व मान्य झालें कीं बोलभाषेस अशुद्ध म्हणण्याचें धाडस कोणी सहसा करणार नाहीं. "आमचा मुलगा" हें व्याकरणशुद्ध असतां कोणी 'आमची मुलगा' म्हटलें तर तें अशुद्ध व तीच कथा "माणसें आलीं" याऐवजीं "माणसें आलास" या प्रयोगाची ! परंतु मराठी भाषेनें "चहा"स पुरुष बनविलें तर गुजराथी भाषेनें त्याची गणना स्त्रीवर्गांत केली; "खून" मराठींत पुंल्लिंगी तर गुजराथींत नपुंसकलिंगी; यांत कोणी कोणास शुद्ध-अशुद्ध म्हणावयाचें ? मूळ संस्कृतांतील 'जन्म, वस्तू' या नपुंसकलिंगी शब्दांनां मराठी भाषेनें अनुक्रमें पुंल्लिंगी व स्त्रीलिंगी केलें तर मूळच्या सिकता, प्राण अशा अनेकवचनी नामांना एकवचनीं बनविलें. अर्थात् संस्कृतच्या दृष्टीनें मराठीपण अशुद्धच ठरेल. मराठीमधीलच उदाहरणें घेतलीं तरी उद्बोधक प्रकाश पडेल. व्याकरणशुद्ध ग्रांथिक "म्यां दिलें" या वाक्याऐवजीं पुष्कळदां आम्ही "मी दिलं" असें म्हणतों तें शुद्ध; परंतु "म्यां दिलं" अगर "मीन् ("मीनें" चें बोलभाषेंतील संक्षिप्त रूप) दिलं" असा प्रयोग आम्हांस अशुद्ध वाटतो कारण तो बोलीचा आहे व संमत ग्रांथिक भाषेंतील नाहीं. "मंदार" हा शब्द एका झाडाचें नांव म्हणून शिष्टसंमत आहे परंतु "तो मन्दारा गेला" यांतील "मागील दार, परस" या अर्थी वापरलेला "मन्दार" (मागील+दार) हा संक्षिप्त सामासिक शब्द बोलभाषेंतील म्हणून शिष्टांस अशुद्ध आणि हेंगाडा वाटणार ! किंबहुना बोलभाषांतूनहि असे कितीतरी योग्य, सूचक अन् मधुर शब्द आहेत कीं ज्यांना आत्मसात् करून प्रमाण-भाषेनें स्वतःस समृद्ध अन् संपन्न करून घ्यावयास हवें. लांबलचक आणि क्लिष्ट अशा संस्कृतनिष्ठ शब्दांची नवी टांकसाळ उघडण्याऐवजीं बोलभाषांचा पद्धतशीर अभ्यास केला तर व्यवहारसुलभ आणि अन्वर्थक असे कितीतरी प्रचलित शब्द बोलभाषांतून उपलब्ध होतील.

बोलभाषा म्हणजे "शुद्ध" भाषेचें विकृत स्वरूप कसें नव्हे याची कल्पना वर स्पष्ट झाली आहेच. हें विकृत (!) स्वरूप नष्ट करून एकच शुद्ध भाषा वापरणारा समाज एकसंधी, सुसंस्कृत होऊन तो सुधारेल व त्यांतील भाषाभेदामुळें निर्माण होणारे उच्च-नीच, पुढारलेला-मागासलेला, सुशिक्षित-अशिक्षित वगैरे भेद किंबहुना जातिभेदहि नाहीसे होतील असें कित्येकांस वाटतें. पण खोल विचारांतीं असें आढळेल कीं, एकतर हे भेद सापेक्ष आहेत, दुसरें ते मानव-निर्मित आहेत आणि मुख्य म्हणजे वरील भेद भाषैक्यामुळें कमी होतील हें तर्कशुद्ध नाहीं. एकभाषिक समाजांतहि हे भेद आढळतात तर भेदविहीन समाजांतपण भिन्नभाषिक लोक एकत्र येऊं शकतात असा अनुभव अनेकदां येतो.

## बोलभाषा मागासलेपणाचें लक्षण नाहीं

बोलभाषा हें मागासलेपणाचें लक्षण आहे हा आक्षेप केवळ न्यूनगंडाचें (आणि दुसऱ्या बाजूनें अहंगंडाचें पण !) द्योतक आहे. आम्ही नोकरीसाठीं इंग्रजी बोलतों, रेल्वे, बस, सिनेमा वगैरे ठिकाणीं हिंदी भाषा वापरतों, सभा-व्याख्यानांतून प्रमाणित मराठी बोलभाषा (ग्रांथिक नव्हे !) स्वीकारतों तर कौटुंबिक जीवनांत आम्ही आमची बोलभाषा वापरली तर त्याचें वैषम्य अगर हीनत्व



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

कां वाटावें हें समजत नाहीं. कोंकणीपण मराठीची एक बोलीच आहे पण तिच्या अभिमान्यांनीं जोर धरल्यामुळें आज आकाशवाणीवर ती सुप्रतिष्ठित आहे आणि सभा, संस्था, संमेलनें, नाट्यप्रयोग, नियतकालिकें व इतर वाङ्मयनिर्मिती अन् संशोधन यांमुळें तिचें क्षेत्र दिनप्रतिदिन वाढतच आहे. एका बोलीच्या उत्कर्षाबद्दल मत्सर वाटण्याऐवजीं बोलीला-पण प्रतिष्ठा प्राप्त करून देतां येते या आत्मविश्वासानें आपल्या बोलींबद्दल साभिमान कौतुक वाटावयास हवें. कोंकणीभाषिक इतरांशीं बोलतानां मराठी, इंग्रजी अथवा हिंदी यांचा उपयोग करतातच ना ? प्रत्येक बोलीचेंपण स्वतंत्र असें साहित्य, शब्दघटना, वाक्य-प्रयोग, व्याकरण आहेच फक्त तें सर्व अलिखित आहे एवढेंच ! तें लेखनिविष्ट करून प्रकाशांत आणणें हें प्रत्येक बोली-भाषिकाचें प्रमुख कर्तव्य आहे. अर्थात् प्रत्येक बोलभाषेला कोंकणीचा दर्जा मिळालाच पाहिजे हा दुराग्रह योग्य ठरणार नाहीं.

बारा कोसांवर भाषा बदलते हा परंपरागत सिद्धांत सर्वसंमत आहे, तो फोल कसा ठरणार ? एकभाषिक आणि आजच्या अणुयुगांत शास्त्रीय प्रगतीच्या उच्च शिखरावर पोहोंचलेल्या पाश्चात्य राष्ट्रांतपण एकच 'शुद्ध' बोलभाषा सर्वांसाठीं प्रचारांत आणणें शक्य ठरलें नाहीं, तर भारतासारख्या बहुभाषिक आणि नवोदित विशाल राष्ट्रांत एका समान भाषेचा सर्वत्र आग्रह धरणें हें वस्तुस्थितीस धरून ठरणार नाहीं. शिवाय तें अनैसर्गिक आणि अशास्त्रीयपण वाटतें. कित्येक पिढीचे रुजून घट्ट झालेले वर्णप्रक्रिया-विषयक संस्कार नष्ट करून त्या ठिकाणीं नवीन निर्माण करणें यासाठीं तितक्याच प्रदीर्घ कालावधीची आणि कष्टांची कास धरावी लागेल.

भाषा हें विचारांचें प्रगमनशील आणि उत्क्रांति-प्रधान वाहन आहे. समाजाच्या विकासाबरोबरच भाषेचापण विकास होतो आणि विचारांत बदल होईल त्याप्रमाणें भाषेंत पण सुसंवाहक बदल होणारच. जर असा बदल होणें व्याकरणाच्या पोलादी चौकटीनें अशक्य केलें तर त्याची परिणति भाषा मृत होण्या-मध्यें होते व याचें ज्वलन्त उदाहरण म्हणजे संस्कृत भाषा ! ज्ञानेश्वर, नरसी मेहता, तुळसीदास यांच्या भाषांच्या तुलनेनें विचार केला तर आजची मराठी, गुजराथी, हिंदी कितीतरी विभिन्न आणि प्रगत आहे. पण आजच्या दृष्टीनें त्यांची भाषा अशुद्ध आणि अविकसित होती म्हणून कांहीं आम्ही त्यांच्या भाषेचा अभ्यास करीत नाहीं; तर आजच्याच भाषेचें स्थल–काल–व्यवसायपरत्वें तें पूर्वकालीन परंतु परिपूर्ण स्वरूप होतें हीच आमची धारणा आहे. ज्याप्रमाणें जुनीं नाणीं चलनांतून लुप्त होऊन त्या ठिकाणीं नवीं नाणीं प्रचारांत येतात त्या-प्रमाणेंच कोणत्याहि भाषेंतील अगर बोलींतील शब्दां-चें आणि वाक्प्रचारांचें आहे. आजच्या बोलभाषेंत आढळणारे शब्द कदाचित् आजच्या प्रमाण-भाषेंत पूर्वी रूढ आणि संमत असतीलहि; परंतु तेथून ते लोप पावल्यामुळें आज अशिष्ट वाटतात इतकेंच ! बोलभाषेनें ते चालूं ठेवले यावरून बोलभाषा अशिष्ट, अशुद्ध आणि मागासलेली तर ठरत नाहींच; पण आजच्या प्रमाण-भाषेचें पूर्वस्वरूप स्पष्ट कर-णारी बोलभाषा ही भाषाशास्त्रीय अभ्यासाचें आणि संशोधनाचें एक प्रमुख साधन म्हणून मान्यता पावत आहे. बोलीवर मागासलेपणाचा आरोप करणें हें आपल्याच अशास्त्रीय आणि उथळ दृष्टि-कोणाचा द्योतक आहे.

बोलभाषा अपूर्ण असते हा आरोपपण वृथाच आहे, कारण, त्या त्या समाजाचे नित्य-नैमित्तिक व्यवहार पार पाडण्यास ती समर्थ आणि स्वयंपूर्ण असते. कदाचित् नवीन कल्पना आणि नवीन वस्तु अभिव्यक्त करावयाचा प्रसंग आलाच तर दुसऱ्या कुठल्याहि प्रमाणित भाषेप्रमाणें परकीय शब्दांची उसनवारी करून अगर नवीन शब्दप्रयोग रूढ करून त्यांना आत्मसात् करण्याइतकी ती उदार-




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मतवादी आणि खेळकर वृत्तीची असते ही गोष्ट अगदीं सामान्य बोलभाषेंतील "इलक्शन, टायफर, फलाट्" वगैरे अनेक शब्दांवरून चांगलीच स्पष्ट होते. याच दृष्टिकोणांतून पाहिलें तर इंग्रजीसारखी पहिल्या प्रतीची जगन्मान्य भाषापण कधींच परिपूर्ण नव्हती व नाहीं हें त्या भाषेंतील ग्रीक, लॅटिन, फ्रेंच, जर्मन, रशियन वगैरे भाषांतील जुन्या-नव्या शब्दांवरून आढळून येईल.

बोलभाषा जिवंत राखल्याच पाहिजेत असें अट्टाहासानें आणि दुराग्रहानें कोण म्हणेल ? शिक्षणाचें वाढतें प्रमाण, वर्तमानपत्रें आणि आकाशवाणी, नोकऱ्या, प्रवास आणि परस्पर व्यवहार यांमुळें बोलभाषा झपाट्यानें नष्ट होत चालल्या आहेत. अभ्यासाच्या आणि संशोधनाच्या दृष्टीनें बोलभाषांचें मूळ आणि "शुद्ध" स्वरूप दाखविणारे भाषिकपण आज दुरापास्त झाले आहेत. संपूर्णपणें लुप्त होण्यापूर्वीच त्यांचीं वैशिष्ट्यें अभ्यासनिविष्ट होणें ही भाषाभ्यासकांपुढील एक महत्त्वाची आणि तातडीची समस्या निर्माण झाली आहे.

---


"नवभारत" मासिक

## जाहिरातीचे दर

| संबंध पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|
| रु. ६० | रु. ३५ | रु. २० |

१. कव्हर पेजसाठीं २५ टक्के अधिक आकार.

२. धातल्या मजकुराबरोबर द्यावयाच्या जाहिरातीस १० टक्के अधिक आकार.

३. वर्षांतील किमान सहा अंकांत जाहिरात दिल्यास १० टक्के सवलत. संपूर्ण वर्षभर जाहिरात दिल्यास २० टक्के सवलत.

४. जाहिरातीच्या आकारावर व्यावसायिक प्रथेनुसार कमिशन देण्यांत येईल.

५. जाहिरातीसंबंधीं अधिक चौकशी व पत्रव्यवहार :

व्यवस्थापक "नवभारत" मासिक
प्राज्ञ प्रेस, वाई जि० उत्तर सातारा










अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. प्रभाकर पुजारी

# सौंदर्यभावना : कांहीं विचार

सौंदर्यभावनेचें विश्लेषण आजवर बऱ्याच मराठी समीक्षकांनीं केलेलें आहे मराठींतील सुप्रसिद्ध टीकाकार कै. श्री. मर्ढेकर यांनीं सौंदर्यभावनेचें स्वरूप इतर भावनांपेक्षां सर्वस्वीं निराळें आहे असें प्रतिपादन केलेलें आहे. त्यांच्यामतें इतर भावना या साधनात्मक असून त्याच्यामार्फत स्वसंरक्षण आणि वंशवर्धन हीं दोन जीवशास्त्रीय ध्येयें साध्य केलीं जातात. याच्या उलट, सौंदर्यभावनेचें स्वरूप स्वयंभू असून तिचा उगम संवाद, विरोध व समतोल या लयतत्त्वांतून होतो. पण सौंदर्यभावना ही इतर भावनांपेक्षां निराळी आहे काय ? याविषयींचें मर्ढेकरांचें विवेचन वाचल्यानंतर ज्या कांहीं शंका माझ्या मनांत उद्भवल्या त्यांचें प्रकटीकरण मी या लेखांत करणार आहे.

### भावनांना जीवशास्त्रीय ध्येयें – असतात असें नाहीं

कुठलीहि भावना ही परिस्थितीचें ज्ञान आणि शारीरिक व मानसिक अंतर्बाह्य व्यापार या दोन अंगावर अधिष्ठित असते हें सर्वस्वी मान्य होण्यासारखें आहे. पण भावना या साधनात्मक असून स्वसंरक्षण व वंशवर्धन हीं जीवशास्त्रीय ध्येयेंच त्यांच्यामुळें साधलीं जातात याबाबत मात्र मतभेद होण्यासारखा आहे. भावना ही शुद्ध स्वरूपांत क्वचितच व्यक्त होते. तिचें स्वरूप बहुधा संमिश्र असतें. एका भावनेंत दुसऱ्या भावनेची छटा तर असतेच पण प्राथमिक अशा एका भावनेचें स्वरूप देखील परिस्थितिभेदानें भिन्न असूं शकतें. औरंगजेबाला संभाजीविषयीं वाटलेला रागच, तुकारामाला भोंदूंच्याविषयीं वाटलेला रागच आणि स्वत: जगांत वाईट प्रवृत्ति निर्माण करून मानवांना दु:ख भोगायला लावणाऱ्या ईश्वराविषयीं उमरखय्यामला देखील वाटलेला रागच ! पहिल्या प्रकारांत कदाचित् स्वसंरक्षणाचें ध्येय असेल पण दुसऱ्यांत जनहिताची कळकळ आणि तिसऱ्यांत सात्त्विकता आहे. दोन्ही प्रकारात स्वसंरक्षणहि नाहीं किंवा वंशवर्धनहि नाहीं. आईला मुलाविषयीं किंवा पतीला पत्नीविषयीं वाटणाऱ्या प्रेमभावनेत वंशवर्धनाचा हेतु आढळेल पण मित्रप्रेमांत तो कुठें असतो ? दोन ठिकाणच्या व्यक्ति एकत्र येतात, त्यांचं हार्दिक तादात्म्य होतें आणि त्या एकमेकांविषयींच्या प्रेमानें भारल्या जातात. प्रेम करावेंसें वाटणें आणि प्रेम करवून घेणें या सहजप्रेरणेंतून या प्रकारच्या प्रेमभावनेचा उद्भव होतो, हेंच त्या भावनच ध्येय ! वंशवर्धन म्हणजे भावना अनुभवणाऱ्या व्यक्तीचें वंशवर्धन असा अर्थ मर्ढेकरांना अभिप्रेत असावा असें मला वाटतें. नाहींतर मानववंश असा अर्थ घेतला तर द्वेषासारख्या भावनेमुळें वंशवर्धन न होतां वंशच्छेद झालेला आढळतो. भावनामुळे स्वसंरक्षण व वंशवर्धन अशासारखीं ध्येयें साध्य केलीं जातात असें नाहीं. आणि म्हणून केवळ याच गोष्टी सुकर करण्यासाठीं भावनांची योजना असत नाहीं. हें एकाच शुद्ध भावनेविषयीं झालें. पण भावना संमिश्र स्वरूपांत आणि कांहीं वेळां तर परस्परविरोधी भावना संमिश्र स्वरूपांत अनुभवाला येतात. सात्त्विक जगांत प्रेमाची छटा असते. राग निष्क्रिय असेल तर त्यांत द्वेषाची छटा असते. प्रेमांत मत्सराची झांक असते. चार्लीचॅपलीनच्या विनोदांत हास्याच्या आवरणाखालीं करुणेचा गाभा आढळतो. आधुनिक








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मानसशास्त्राप्रमाणें आत्यंतिक प्रेम व आत्यंतिक द्वेष या एकाच भावनेच्या दोन बाजू आहेत. अशा परिस्थितींत भावनांना कांहीं विशिष्ट जीवशास्त्रीय ध्येयें असतात असें म्हणतां येणार नाहीं. आणि म्हणूनच या निकषावर तपासून सौंदर्यभावनेचा निराळेपणा सिद्ध करतां येणार नाहीं.

## भावनेचा उगम हेत्वात्मकतेंत असतो.

'भावना साधनात्मक' नसून तिचें स्वरूप प्रतिक्रियात्मक असतें. कुठलीहि भावना हा एक प्रकारचा विचारच असतो. वस्तुनिष्ठ विचारांतून तत्त्वज्ञानें व शास्त्रें निर्माण होतात. भावनेस अभिप्रेत असलेला विचार हा आत्मनिष्ठ असतो. भावनात्मक प्रतिक्रियांच्या मागें तीन प्रकारचीं कारणें असतात असें गिलफोर्ड या मानसशास्त्रज्ञानीं प्रतिपादन केलेलें आहे. (१) एकाद्या हेतूचें प्राबल्य जितकें जास्त तितकी प्रतिक्रिया अधिक भावनात्मक असते. औरंगजेबाच्या क्रोधामागें धर्मान्धता होती. क्रांतिकारकांच्या शौर्यामागें स्वातंत्र्यप्रीति असते. क्रौर्यामागें सत्तालोलुपता असते. (२) जेव्हां हेतु परिस्थितीमुळें अथवा दुसऱ्या कुठल्याहि कारणानें दडपले जातात तेव्हां भावनात्मक प्रतिक्रिया निर्माण होते. हेतुसिद्धि झाली नाहीं तर दुःखाची अथवा क्रोधाची भावना निर्माण होते. (३) भावनेची निर्मिति कांहीं वेळां हेत्वात्मकता ( motivation ) नाहीशीं होण्यांतहि असते. हेतुपूर्ति झाल्यानंतर हेतु नाहींसा होतो आणि त्यांतून आनंदाची निर्मिति होते. विरोधी गुणधर्माच्या एकाद्या नव्या हेतूमुळें मूळचा हेतु नाहींसा होतो आणि कारुण्याची निर्मिति होते. लोकानुराधनेच्या कर्तव्यामुळें रामाच्या सुखी संसाराचा हेतु नाहींसा होतो आणि त्यांतून दुःखाची भावना निर्माण होते. अशा रीतीनें प्रत्येक भावनेचा उगम हा हेत्वात्मकतेंत असतो. हेतु हा जीवशास्त्रीयच केवळ नव्हे तर कुठल्याहि प्रकारचा असू शकतो.

## संवेदनांची संगति व्यक्तिगत आणि संस्कारप्रेरित

भावनांच्या ज्या दोन अंगांच्या अनुरोधानें श्री. मर्ढेकर यांनीं सौंदर्यभावनेचें स्वरूप ठरवण्याचा प्रयत्न केलेला आहे त्याचा आतां विचार करूं. भावनांचें पहिलें अंग म्हणजे 'भावनोद्दीपक परिस्थितीचें ज्ञान.' बाह्य परिस्थितींतून ज्या संवेदना मनुष्याच्या ठिकाणीं निर्माण होतात त्यांची संगति लावण्याचा प्रयत्न तो करीत असतो हे खरें. पण सौंदर्यात्मक अशी निराळी संगति असते का? वास्तविक ही संगति दोनच प्रकारची असते. (१) सहजप्रेरित. यांत व्यक्तिवैशिष्ट्याचा समावेश होतो. (२) अनुभवजन्य. अनुभवाला येणाऱ्या कांहीं संवेदनांची संगति मनुष्य सहजप्रेरणेने लावीत असतो. ती आपोआप निर्माण होते. याप्रकारच्या संगतीला शेकडों वर्षांचे वंशपरंपरागत संस्कार आणि व्यक्तिवैशिष्ट्य या गोष्टी कारणीभूत असतात. ही संगति इतर भावनांच्या बाबतींत जशी आढळते तशीच सौंदर्यभावनेच्या बाबतींतहि आढळते. पहिल्याच भेटींत प्रेमभावनेचा उद्भव होणं यांत instinct चा भाग असतो. 'व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतुः' असे उद्गार 'उत्तररामचरितां'तला राम लवाला पहिल्यानंतर काढतो याचें कारण हेंच. शृंगारभावनेचें अधिष्ठान सहजप्रेरणात्मक संगतीवर आहे. अनपेक्षित असा मोठा आवाज झाल्याबरोबर भीतीचा उगम होण्यांत सहजप्रेरणात्मक संगतीचा भाग असतो. हीच संगति सौंदर्यभावनेंतहि आढळते, साहित्याशिवाय इतर ललितकलांच्यामुळ निर्माण होणारी सौंदर्यभावना ही सहजप्रेरणात्मक संगतींतून निर्माण होते. हाडींमासीं खिळलेले संस्कार व व्यक्तिवैशिष्ट्य यांवर ही सौंदर्यभावना अधिष्ठित असते. नादलहरींच्या आरोहावरोहांनीं अनुकल संवेदना निर्माण होणें हा संस्कारांचा परिणाम आणि विशिष्ट रागानें मोहित होणें यांत व्यक्तिवैशिष्ट्याचा भाग









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असतो. विशिष्ट रागांत, विशिष्ट फुलांत, किंवा विशिष्ट वाद्याच्या नादलहरींत ' सौंदर्य आढळणें यांत भावना अनुभवणाऱ्या व्यक्तीच्या वैशिष्ट्याचा अंश असतो. संवेदनांची संवाद, विरोध, समतोल यासारख्या लयतत्त्वावर अधिष्ठित अशी सौंदर्यात्मक संगति लावली जात असेल तर सौंदर्यसंवेदनाक्षम व्यक्तीच्या ठिकाणीं पाश्चात्य अथवा भारतीय कुठल्याहि प्रकारच्या संगीतामुळें सौंदर्यभावना निर्माण झाली पाहिजे, पण तस आढळत नाहीं. सगळ्या रागांत लयतत्त्वें असूनहि सगळे राग सर्वांना प्रिय असत नाहींत. एकाच रागाची परिणामक्षमता निरनिराळ्या वाद्यावर निरनिराळी आढळते. माझा स्वतःचा अनुभव असा आहे कीं सतारीपेक्षां सनईनें माझ्या चित्तवृत्ति अधिक तल्लीन होतात. संवेदनांची मर्ढेकरांना अभिप्रेत असलेली संगति लयतत्त्वावर अधिष्ठित नसून ती व्यक्तिगत आणि संस्कार-प्रेरित अशी असते. पांढऱ्या कागदाला काळी शाई फासली तर विरोध हें लयतत्त्व असूनहि सौंदर्य-भावना निर्माण होणार नाहीं. गुलाबामध्यें सौंदर्य आढळणें किंवा कर्पूरगौरकांतीमध्यें सौंदर्य आढळणें हा लयतत्त्वाचा परिणाम नसून व्यक्तिवैशिष्ट्याचा आहे. इतर ललितकलांच्यामुळें जी सौंदर्यभावना निर्माण होते ती अंतःप्रेरित संगतींतून !

## अनुभवजन्य संगतींतून सौंदर्यभावनेची निर्मिति

संवेदनांची दुसऱ्या प्रकारची संगति म्हणजे अनुभवजन्य संगति. याप्रकारच्या संगतीमध्यें तर्कशास्त्रांचा समावेश होतो. पण तर्कशास्त्रीय संगतीपेक्षां हिचें क्षेत्र व्यापक आहे. तर्कशास्त्राच्या सांगाड्यामध्यें न बसणारी अशी संगति मेंदू पुष्कळदा लावतो ती अनुभवाच्या जोरावर. मानवी मन तर्कशास्त्राच्या चौकटीत बसत नाहीं. चंद्राचें चांदणें हें दाहक आणि शामक कसें असतें याची संगति अनुभवामुळेंच भावना अनुभवणारा जाणूं शकतो. पाणी हें डोळ्याच्या बुबुळासारख्या नाजुक पदार्थाला थोडीसुद्धा इजा करीत नाहीं पण मोठमोठे खडक तें दुभंगून टाकतें हें सत्य तर्कशास्त्राच्या नव्हे तर अनुभवाच्याच बळावर ग्रहण केलें जातें. साहित्यामध्यें हीच अनुभवजन्य संगति अभिप्रेत असते. वाङ्मयामध्यें ही संगति जेव्हां पूर्णत्वानें जाणवते तेव्हांच सौंदर्यभावनेची निर्मिति होते. संवेदनांच्या ' अर्थात्मक संदेशांची लयतत्त्वावरच अधिष्ठित अशी सौंदर्यात्मक संगति वाङ्मयांत अभिप्रेत असते असें श्री. मर्ढेकरांचें मत आहे. त्यांनीं एक श्रीमंत व एक गरीब यांचें उदाहरण देऊन असें म्हटलेलें आहे कीं दोघांच्या वागणुकीमधल्या विरोधामुळें केवळ जी भावना निर्माण होईल ती सौंदर्यभावना. पण मला असें वाटतें की एक गरीबच दुसऱ्या गरीबाची व्यथा जाणूं शकतो, श्रीमंताला त्याची कल्पना येणें शक्य नाहीं अशा प्रकारची विश्वव्यापक संगति जाणवल्यामुळेंच सौंदर्यभावनेचा उगम होत असावा. मॅक्बेथ आणि लेडी मॅक्बेथ यांमधल्या विरोधापेक्षां प्रत्येकाचा स्वभाव, प्रत्येकाचीं कृत्यें आणि प्रत्येकाचा अंत यांमधली अंतर्गत संगति जेव्हां वाचकाला जाणवते तेव्हांच सौंदर्यभावनेची निर्मिति होते. ती संगति तर्कशास्त्रीय अथवा मानसशास्त्रीय नसून स्वतःच्या किंवा इतरांच्या अनुभवानें जी जाणीव वाचकाला झालेली असते तिच्या द्वारें लावलेली असते. व्यक्तीच्या विनाशाला व्यक्तिदोषांबरोबरच परिस्थितिहि कशी कारणीभूत होते, व्यक्तीच्या स्वभावांतून कृति निर्माण होते आणि उलट कांहीं कृतींचा परिणाम स्वभावावर कसा होतो हें जाणवल्यानें सौंदर्यभावनेची निर्मिति होते. चेटकिणींच्या भविष्यवाणीमुळें उद्दीपित होणें हा मॅक्बेथचा दोष असला तरी डंकननें माल्कमला राज्याभिषेक करण्याचा विचार बोलून दाखवणें किंवा लेडी मॅक्बेथसारखी पत्नी असणें यांत दैवाचाच अंश आहे. सबंध नाट्यकृति म्हणजे दैव ( Destiny ) आणि अपराधाचें दैवी शासन



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

( Nemesis ) यांची कलात्मक गुंफण आहे. प्रतिकूल परिस्थिति नाहीशी करण्याचा मॅक्‌बेथ जसजसा प्रयत्न करीत जातो तसतसा तो प्रतिकूल परिस्थितींत अधिकाधिक गोवला जातो. मॅक्‌बेथच्या विनाशाचीं बीजें त्याच्या उत्कर्षांतच लपलेलीं आहेत. वाङ्मयांत जेव्हां अशी विश्वव्यापक संगति जाणवते तेव्हांच सौंदर्यभावना निर्माण होते. व्यक्तीच्या अनुभवांच क्षितिज जितकें विशाल तितकी तिची सौंदर्यसंवेदनक्षमता अधिक तीव्र. इतर भावनांच्या बाबतींत हीच अनुभवजन्य संगति आढळते. मर्ढेकरांनीं संवेदनांच्या तर्कशास्त्रीय संगतीचें जें उदाहरण दिलें आहे तेंच घेऊन असें म्हणतां येईल कीं वाघ पाहिल्यानंतर पाहणाऱ्याच्या मनांत कोणती भावना निर्माण होईल हें त्याच्या अनुभवावर अवलंबून राहील. सर्वसाधारण व्यक्तीच्या मनांत भीतीची भावना निर्माण झाली तरी ज्याने वाघांशीं झुंज करून त्यांना ठार केलेलें आहे अशाच्या मनांत शौर्याची भावना निर्माण होईल. म्हणून अशा अर्थात्मक संगतीला तर्कशास्त्रीय म्हणण्यापेक्षां अनुभवजन्य म्हणणं अधिक योग्य ठरेल. वाङ्मयकृतीमधल्या निरनिराळ्या घटकांमधली आंतरिक संगति जितकी पूर्णांशानें अनुभवाला येईल तितक्या प्रमाणांत कलाकृतीपासून लाभणारा आनंद मोठा. सौंदर्यभावना विशाल अर्थ जाणवल्यामुळें निर्माण होते.

श्री. मर्ढेकरांच्या म्हणण्याप्रमाणें गुणांचें आकलन अर्थाशिवाय असूं शकतें. माझ्यामतें गुणांच आकलन आणि अर्थाची प्रतीति यांचा संबंध अविभाज्य आहे. जिभेवर एखादा पदार्थ ठेवल्यावर त्याची चव कळते आणि तो कोणता पदार्थ असावा त्याचहि ज्ञान होतें. मर्ढेकरांच्या मतें संवेदनांची अर्थसूचकता जितकी जास्त तितकें गुणांचें आकलन कमी. एखाद्या पानावरच्या मजकुराकडे आपलें लक्ष कितीहि वेधलेलें असलें तरी पानाच्या रंगाची आपल्याला जाणीव असते. बुभुक्षिताचें लक्ष जेवणाकडे अधिक असलें तरी प्रत्येक पदार्थाची चव तो निश्चितपणें सांगूं शकेल. निरनिराळ्या रंगांचीं नांवें ठाऊक नसणें याला गुणांच्या आकलनाचा अभाव असें म्हणतां येणार नाहीं. अर्थसूचकता आणि गुणाचें आकलन यांमध्यें व्यस्त प्रमाण नसून त्या गोष्टी परस्परसापेक्ष आहेत. या दृष्टीनें पाहिलें तर लहान मुलांच्या ठिकाणीं अर्थसूचकता जाणण्याची शक्ति नसल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं गुणांचें आकलन परिपूर्ण असतें हें मान्य होण्यासारखें नाहीं. लहान मुलांच्या तन्मयतेला संवेदनागुणांच्या आकलनापेक्षां नावीन्याविषयींचें कुतूहलच कारणीभूत असतें. मोठीं माणसें बोलत असतांहि लहान मूल त्यांच्याकडे एकाग्रतेनें पाहात राहतें. मूल भांड्याच्या कर्कश आवाजानेंहि तन्मय होऊन जातें. नावीन्य हें त्याच्या आकर्षणाचें मूळ असतें. संवेदनाच्या अर्थाचें किंवा गुणांचें आकलन होण्याएवढी मानसिक वाढ त्याची झालेली नसते. कलावंताची दृष्टि लहान बालकांसारखी असते याचा अर्थ इतकाच कीं नेहमींच्या प्रसंगांतलें नावीन्य त्याला प्रतीत होत असतें. तें कलावंताचं मन अतिशय संस्कारक्षम असतें. कलावंताला जाणवणारा पदार्थातील सुप्त नवीन 'अर्थ' म्हणजेच त्या पदार्थाचा गुण! कुठलीहि संवेदना ही अर्थाविना प्रतीत होत नाहीं. रंग, रेषा, घनता यांच्याबरोबरच एकप्रकारचा जिवंतपणा आपल्या चित्रांत ओतूं शकला म्हणून त्याच्या कलेची महति अधिक. विशिष्ट




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्वरसंगति आणि कारुण्य यांचें 'जोगिया' मधलें साहचर्य अविभाज्य आहे.

## सौंदर्यभावनेचें वैशिष्ट्य इतर अनुकूल– भावनांनाहि लागूं पडतें

शारीरिक अंतर्बाह्य प्रतिक्रिया हें जें भावनांचें दुसरें अंग त्याचा विचार करीत असतांना श्री. मर्ढेकरांनीं एकाच प्रकारच्या भावनांचा विचार केलेला आहे. 'शारीरिक प्रतिक्रियांचा रोख प्राप्त परिस्थितीला इष्ट रीतीनें तोंड देणें सुकर व्हावें याकडे असतो' हें मर्ढेकरांचें विधान फक्त प्रतिकूल भावनांनाच लागूं पडतें, कांहीं भावना अनुकूल परिणाम करणाऱ्या व कांहीं प्रतिकूल परिणाम करणाऱ्या असतात. 'जेथें सभोंवतालची परिस्थिति व्यक्तीला अशारीतीनें तोंड द्यायला भाग पाडत नाहीं तेथें भावनेचा अनुभव येत नाहीं' हें श्री. मर्ढेकरांचें विधान अनुकूल भावनांच्या बाबतींत खोटें ठरतें. अनुकूल भावना अनुभवणारी व्यक्ति स्वतःला अधिकाधिक भावनेंत गुंतवून घेते. सौंदर्यभावना ही प्रेम, सौख्य यांसारखी अनुकूल भावना आहे. 'अधिकाधिक तन्मयतेनें भावनानुभूति' हें सौंदर्यभावनेचें मर्ढेकरांनीं केलेलें वर्णन इतर अनकूल भावनांनाहि लागूं पडतें. प्राप्त परिस्थितीला तोंड देणें म्हणजे मर्ढेकरांच्या दृष्टीनें भावनोद्दीपक घटकांमध्यें बदल घडवून आणणें. मनुष्य जेव्हां आनंदाची अथवा प्रेमाची भावना अनुभवीत असतो तेव्हां तो भावनोद्दीपक घटकांत बदल तर करीत नाहींच पण उलट अधिक रममाण होतो, प्रतिकूल भावना जरी घेतली तरी प्रिय व्यक्तीच्या निधनानें दुःखी झालेला मनुष्य भावनानुभव घेतांना भावनोद्दीपक घटकांत कितपत बदल घडवून आणूं शकतो ? म्हणून प्राप्त परिस्थितीला तोंड देणें किंवा भावनोद्दीपक घटकांमध्यें बदल घडवून आणणें या भावनेचें स्वरूप ठरवणाऱ्या निखालस अशा कसोटया नाहीत कीं ज्यांच्याद्वारें सौंदर्यभावनेचें निराळेंपण सिद्ध होऊं शकतें.

भावनांच्या जीवशास्त्रीय संदर्भाबद्दल गमक म्हणून श्री. मर्ढेकरांनीं जें उदाहरण दिलेलें आहे तें अपुरें आहे. प्राथमिक भावनांचा अनुभव नसणारी व्यक्ति सांपडणें जितकें कठीण तितकेंच सौंदर्यभावनेचा अनुभव नसणारी व्यक्ति सांपडणें देखील कठीण आहे. देश—काल—व्यक्ति अनुसारें सौंदर्याच्या कल्पना बदलतील पण सौंदर्यभावना ही मात्र फार पुरातन आणि सार्वत्रिक आहे. सौंदर्यभावना मुळींच न अनुभवलेली व्यक्ति सांपडणें जसें शक्य आहे तसेंच द्वेषाचा मागमूसहि नसलेली येशू खिस्त किंवा सॉक्रेटिस किंवा एकनाथ यासारखी व्यक्तीहि असूं शकते.

सौंदर्याचें अस्तित्व व्यक्तीच्या ज्ञानावर अवलंबून नसलें तरी 'सौंदर्यभावने' चें अस्तित्व व्यक्तिसापेक्ष आहे, इतर भावनांप्रमाणें तिचें अधिष्ठान व्यक्तिवैशिष्ट्यावर व व्यक्तीच्या अनुभवावर आहे. सौंदर्यभावना ही इतर भावनांसारखीच एक भावना आहे. फक्त ती अनुकूल आहे इतकेंच !




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. ग. ल. चंदावरकर

# अब्राहाम लिंकन

" माझे चार भाऊ आहेत. त्या चौघांपैकीं कांहीं नक्की आपल्यालाच मत देतील, अन् आपण दाढी वाढवली तर मी राहिलेल्यांचीं मतेंहि आपल्याला मिळवून देण्याचा प्रयत्न करीन. आपण दाढी वाढवली तर आपला हाडकुळा चेहरा अधिक देखणा दिसेल. सर्व बायकांना पुरुषांनीं दाढी ठेवलेली आवडते. त्या आपल्या नवऱ्यांना खिजवतील अन् आपल्यालाच मत देण्यास भाग पाडतील मग आपण नक्की अध्यक्ष व्हाल. "

एका अकरा वर्षांच्या मुलीनें अब्राहाम लिंकनला लिहिलेल्या पत्रांतील हा उतारा आहे. त्यावेळीं अमेरिकेंतील संयुक्त संस्थानाच्या अध्यक्षीय निवडणुकीचा सामना सुरू झाला होता. ग्रेस बेडेलनें लिंकनचा फोटो पाहिला. तो तिला आवडला, पण गालफडें बसलेला चेहरा पाहून तिला वाटलें—क्षणार्धात फोटोंतील लिंकनच्या चेहऱ्यावर तिला दाढी दिसूं लागली. तिनें लिंकनला पत्र लिहिलें. पत्राचें उत्तर तिला एक आठवड्याच्या आंत मिळालें. अब्राहाम लिंकनचें पत्र आपल्याला आलें याचा आनंद झाला, पण " दाढीसंबंधीं तूं लिहिलंस खरं, पण आतां मी दाढी ठेवायला सुरुवात केली तर लोक मला मूर्खांत काढणार नाहींत का ? " असें त्यानें लिहिल्यामुळें तिची थोडीशी निराशा झाली. ' थोडीशी ' म्हणण्याचें कारण, लिंकनसारखा मोठा माणूस आपलें म्हणणें ऐकेल अशी तिची अपेक्षा नव्हती.

निवडणूक झाली, अब्राहाम लिंकन निवडून आला. इ. स. १८६१ च्या फेब्रुवारी महिन्याच्या १६ तारखेस प्रे. लिंकन वॉशिंगटनला जावयास निघाला. वाटेंत त्याची स्पेशल आगगाडी वेस्टफील्ड जवळच्या स्टेशनवर थांबली. नव्या अध्यक्षांना पहाण्यासाठीं सर्व लोक तेथें जमा झाले. त्यांत ग्रेसचे आईवडील तिला व तिच्या इतर भावंडांना घेऊन आले होते. जमलेल्या लोकांना उद्देशून लिंकननें एक छोटेसें भाषण केलें. भाषणाचे शेवटीं तो म्हणाला, " या ठिकाणीं मला पत्र लिहिणारी एक छोटी लेखिका रहाते. तिला भेटायची माझी इच्छा आहे. आहे का ती इथं ? " नांव काय तिचं ? " लोक मोठ्यानें ओरडले. " तिचं नांव ग्रेस बेडेल. " त्यानें ग्रेसचें नांव उच्चारतां क्षणीं तिचा बाप तिला घेऊन गर्दींतून वाट काढीत पुढें आला. लिंकननें पुढें होऊन तिला वर उचललें व तिचा मुका घेतला. नंतर तो म्हणाला, " पाहिलीस ही दाढी ? तुझ्या सांगण्यावरून मी ही वाढवली. "

## ' न पुरे ही वाणी '

अब्राहाम लिंकनच्या चरित्रांतील असंख्य रम्य व चित्तवेधक कथांपैकीं ही एक आहे. आणि या कथेवरून त्याच्या चारित्र्यसंपदेंत चमकणाऱ्या विविध गुणरत्नांतील एकाचें दर्शन घडतें. कोणत्याहि थोर व्यक्तीचें गुणवर्णन करतांना " काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । " हा तुकाराममहाराजांच्या एका सुप्रसिद्ध अभंगाचा पहिला चरण आठवतो. याच अभंगांतील " जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टवीती उपकारें ॥ " हे शब्द अब्राहाम लिंकनच्या चरित्राला व जीवनकार्याला अक्षरशः लागू पडण्यासारखे आहेत, " काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । " असें मात्र खरोखर ज्यांच्या जीवनकार्यासंबंधीं म्हणावें लागतें, अशा जगाच्या इतिहासांतील फार थोड्या संतांच्या मालिकेंत बसण्याची त्याची योग्यता आहे. कांहीं दिवसांपूर्वी एका अमेरिकन पंडिताचीं मुंबईत अब्राहाम लिंकन व आजच्या जागतिक घडामोडी या विषयावर व्याख्यानें झालीं. त्यानें एका व्याख्यानाच्या सुरुवातीस असें सांगितलें कीं लिंकनच्या चरित्रावर



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पांच हजारांवर पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत, आणखी लिहिलीं जात आहेत; व लिंकनच्या चरित्रावर इंग्रजी भाषेंत जितकीं पुस्तकें उपलब्ध आहेत तितकीं, येशू ख्रिस्ताचें चरित्र वगळल्यास दुसऱ्या कोणाहि व्यक्तीच्या चरित्रावर उपलब्ध नाहींत. आज त्याचा जन्म होऊन नुकतींच दीडशें वर्षे ( ता. १२ फेब्रुवारी १९५९ रोजीं ) पूर्ण झालीं व त्याच्या मृत्यूस लवकरच एक शतक पूर्ण होईल, तरी त्याच्या चरित्राची थोरवी जगभर भक्तीनें गाईली जात आहे ही गोष्ट त्याच्या चरित्राचा अलौकिकपणा व असामान्यता पटविण्यास पुरेशी आहे.

## तेजस्वी लोकाग्रणी

लिंकन मुत्सद्दी होता, राजकारणांतील डावपेंच चांगल्याप्रकारें कळण्याइतकी चतुराई त्याचे अंगीं होती. व्यवहारापासून, सार्वजनिक जीवनांतील धक्काधक्कीपासून, दूर रहाण्यास प्रवृत्त करणारें वैराग्य किंवा विरक्तीचें तत्त्वज्ञान त्याच्या साधुपणांत नव्हतें. गुलामगिरी नष्ट करण्यासाठीं तो दक्षिणेंतील संस्थानांविरुद्ध प्राण पणाला लावून झगडला. “ ज्याप्रमाणें मी स्वतः कुणाचाहि गुलाम होणार नाहीं, त्याप्रमाणें इतरांवर स्वामित्वहि गाजविणार नाहीं ” हें समतेचें तत्त्व त्यानें नुसतें प्रतिपादलें किंवा शिरसावंद्य मानलें असें नव्हे तर तें सत्यसृष्टींत आणण्यासाठीं त्यानें केलेल्या प्रयत्नांत अखेरीस त्याच्या प्राणाची आहुति पडली. इतकी उच्च कोटींतील भूतदया व अनुकंपा त्याचे ठिकाणीं-नव्हे त्याच्या रोमारोमांत भिनून राहिली होती, तरी अहिंसेचें तत्त्व उराशीं बाळगून, मी कधींहि युद्धास मान्यता देणार नाहीं असा अत्याग्रह त्यानें बाळगला नाहीं. युद्ध हा स्खलनशील मानवाच्या हातून घडणारा एक प्रमाद आहे असें त्याचें स्पष्ट मत होतें. मानवांना दुराचरणापासून परावृत्त करून सन्मार्गाकडे नेण्याचे प्रयत्न सर्व पापभीरु व सच्चरित्र माणसांनीं करावे, पण कोणीहि स्वतःकडे सदाचरणाचा मक्ता घेऊं नये असें त्याचें धोरण होतें व हीच दृष्टि त्यानें बाळगली व म्हणून आपण पुरस्कृत केलेल्या ध्येयांचें जनन करण्यासाठीं युद्ध अटळ आहे हें जेव्हां त्याला समजून आलें तेव्हां दक्षिणेंतील संस्थानांना ताळ्यावर आणण्यसाठीं त्यानें उत्तरेकडील संस्थानांचे हातीं शस्त्र देऊन त्यांना समरांगणांत उतरविलें. मानवी व्यवहारांत दुष्टपणा व सौजन्य, स्वार्थ व उदारता यांचा झगडा सुरू झाला असतां तो मिटविण्यासाठीं राजकारणाच्या व राज्यकारभाराच्या क्षेत्रांत कसें वागावें, कोणतें धोरण बाळगावें व जनतेला अचूक मार्गदर्शन कसें करावें, हें ओळखून निरपवाद आत्मविश्वासानें व धैर्यानें वागणाऱ्या लोकाग्रणीचें अब्राहाम लिंकनसारखें तेजस्वी उदाहरण जगाच्या इतिहासांत दुसरें सांपडणें कठीण आहे. व्यवहार व नीति, किंवा व्यवहार व उच्चतत्त्व किंवा व्यवहार व भूतदया यांची इतक्या उत्तम रीतीनें सांगड घालणारा राजकारण धुरंधर दुसरा क्वचित्‌च झाला असेल !

## “ अध्यक्ष होऊं नकोस; प्राण घेतील ”

सात आठ मोजक्या वाक्यांत सांगतां येईल इतकें सरळ व साधें लिंकनचें चरित्र आहे. त्याचा जन्म दीडशें वर्षांपूर्वीं इ. स. १८०९ त फेब्रुवारीच्या बारा तारखेस गरीब स्थितींतील आईबापांचे पोटीं झाला. लहानपणींच त्याची आई वारली, पण त्याची सावत्र आई सेरा लिंकन हिनें त्याचेवर आपल्या पोटच्या मुलाइतकें प्रेम केलें. “ अब्राहाम, तूं कांहीं केल्या अमेरिकेचा अध्यक्ष होऊं नकोस. लोक तुझा प्राण घेतील. ” असें ती त्याला मोठेपणीं आर्जवून सांगत असे. इ. स. १८६५ त लिंकनचा खून झाला तो पहाण्यासहि त्याची ती दुर्दैवी आई जिवंत होती. त्यानें जें कांहीं शिक्षण मिळविलें तें पोटासाठीं नोकरी करीत असतां व स्वतःच्या प्रयत्नांवर व कष्टांवर अवलंबून राहून वयाचीं पन्नास वर्षे उलटेपर्यंत वकिली संभाळून कायदेमंडळाचा सभासद म्हणून तो सार्वजनिक कार्य करीत होता, तरी त्याला विशेष प्रसिद्धी मिळाली नव्हती. पण लहानपणापासून त्याचे अंगी महत्त्वाकांक्षा, सत्यनिष्ठा व बाणे-






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दारपणा हे गुण विकसित होत गेले व ज्यांच्याशीं त्याचा सार्वजनिक जीवनांत संबंध आला त्या सर्वांच्या निदर्शनास आले. त्यामुळें हा अलौकिक सामर्थ्याचा पुरुष आहे अशी त्यांची खात्री होऊन चुकली होती व म्हणूनच त्यांनीं इ. स. १८५९ त अध्यक्षाचे निवडणुकीसाठीं त्याला उभें केलें व निवडून दिलें. पुढील पांच सहा वर्षें अध्यक्ष या नात्यानें त्यानें दुहेरी ध्येय आपल्या डोळयापुढें ध्रवताऱ्याप्रमाणें अढळ ठेविलें. तें म्हणजे गुलामगिरीची चाल बंद पाडणें व अमेरिकेच्या संस्थानांना विभक्त होऊं न देणें. त्याच्या अध्यक्षीय कारकीर्दीचीं चार वर्षें या दुहेरी ध्येयाच्या संरक्षणासाठीं सुरू झालेल्या यादवींत गेलीं. युद्ध इ. स. १८६५ च्या सुरवातीस संपलें. लिंकनचा व त्याच्या तत्त्वांचा विजय झाला. अमेरिकन संस्थानें अविभाज्य राहिलीं, गुलामगिरीची चाल त्यानें कायद्यानें बंद केली. युद्धसमाप्तीचा आनंदोत्सव चालू असतांनाच एका माथेफिरूनें त्याचेवर गोळया झाडून त्याच्या प्राणांची आहुति घेतली. इ. स. १८६५ च्या एप्रिल महिन्याच्या चौदा तारखेस अब्राहाम लिंकनचें प्राणोत्क्रमण झालें.

### अन्यायाविरुद्ध चीड व परोपकार बुद्धि

शरीरयष्टीचा कणखरपणा व सडपातळ, कुरूप शरीराकृति या दोन शारीरिक गुणदोषांचा अब्राहाम लिंकनच्या व्यक्तित्व विकासावर बराच परिणाम झाला होता. आयुष्याच्या सुरुवातीस एका दुकानांत नोकर म्हणून काम करीत असतां गांवांतील कांहीं रिकामटेकड्या तरुणांच्या टोळीच्या बेजबाबदार खोड्यांना आळा घालण्याचे कामीं त्याला त्याच्या कणखर प्रकृतीचा उपयोग झाला. या प्रसंगामुळें त्याच्या स्वभावांतील अन्यायाबद्दल चीड व परोपकार बुद्धि हे गुण जसे लोकांच्या निदर्शनास आले तसाच त्यांच्या विकासास वाव मिळत गेला. या दुकानांत काम करीत असतांनाच त्यानें व्याकरण, गणित इत्यादि विषयांचा अभ्यास करून त्यांत पारंगतता मिळविली. व्याकरणाचें पुस्तक दुर्मिळ होतें तें मिळविण्याठीं त्याला शेजारच्या गांवीं चालत जाऊन यावें लागलें. पुढें जेव्हां कायद्याचा अभ्यास करून तो वकील झाला तेव्हां अगदीं लहानसहान मुद्यांचें देखील अचूक ज्ञान व्हावें म्हणून त्यानें प्रयत्नांची पराकाष्ठा केली. एकदां demonstrate या शब्दाचा अर्थ त्याच्या लक्षांत नीटपणें येईना. तो समजून घेण्यासाठीं त्यानें भगीरथ प्रयत्न केले. प्रयत्न करीत असतां तो स्वतःस बजावीत असे कीं, “ अब्राहाम तुला demonstrate या शब्दाचा अर्थ जर नीट समजला नाहीं तर तुझ्या हातून वकीली कधींहि नीट होणार नाहीं हें पक्कें ध्यानांत ठेव. ” अखेरीस युक्लीडच्या सर्व ग्रंथांतील सिद्धांत बिनचूकपणें आधारास देण्याचें सामर्थ्य जेव्हां त्याचे मनांत उतरलें तेव्हां त्यानें “ आतां demonstrate या शब्दाचा काय अर्थ हें मला समजलें. ” असा समाधानाचा सुस्कारा टाकला. एकदां तो फुरसतीच्या वेळांत एका गंजीवर समोर पुस्तक धरून पडला होता. त्याचा मित्र त्या ठिकाणीं आला, त्यानें विचारलें, “ काय वाचीत आहेस रे ? ” “ मी वाचीत नाहीं – मी अभ्यास करीत आहें. ” असें त्यानें उत्तर दिलें. अब्राहाम लिंकनच्या नांवाला त्याचे चरित्रकार Honest ( प्रामाणिक ) हें विशेषण कटाक्षानें जोडतात. या विशेषणाची पात्रता त्याच्यांत केवळ व्यवहारांतील सचोटीमुळेंच आली होती असें नाहीं. विचारांतील अप्रामाणिकपणा, स्वीकृत ध्येयांशीं प्रतारणा, श्रीमंतीची हांव, चैनबाजी हे सर्व प्रकार तो बोलण्यांतील, वागण्यांतील व व्यवहारांतील अप्रामाणिकपणाइतकेच निषिद्ध समजत असे. त्याच्या कपड्यांतील गबाळेपणामुळें त्याच्या पत्नीचे कडक शब्द त्याला नेहमीं ऐकून घ्यावे लागत. पण हा गबाळेपणा त्याच्या स्वभावांतील अपरिग्रह व साधेपणा या गुणांचें प्रतिबिंब होता. श्रीमंती म्हणजे आपल्याला आवश्यक नसलेल्या वस्तूंचा संचय. ”






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ही त्यानें श्रीमंतीची व्याख्या ठरविली होती. पण श्रीमंतीसंबंधींची त्याची ही भावना केवळ बाह्य श्रीमंतींपुरतीच होती. विचारांच्या व ध्येयांचे बाब-तींत मात्र त्याच्या मनाची हांव, त्यानें आपल्या ( speed नांवाच्या ) एका मित्राला लिहिलेल्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें : " I have no doubt it is the peculiar misfortune of both you and me to dream dreams of Elysium for exceeding all that anything earthly can realise. " अशा स्वरूपाची होती.

## गगनाला गवसणी घालणारीं ध्येयें

प्रत्यक्ष स्वर्गाला गवसणी घालणाऱ्या त्याच्या आकांक्षेचें त्यानें for exceeding all that any thing earthly can realise हें स्वरूप अशक्य कोटींतील होतें असें नसून earthly म्हणजे केवळ पार्थिव किंवा ऐहिक अशा प्रयत्नांनीं गांठावयाचें त्याचें ध्येय नव्हतें. अमेरिकन संस्थानांना विभक्त होऊं न देतां गुलामांना स्वातंत्र्य मिळवून देण्याचें महान् श्रेय त्यानें जें संपादिलें तें त्याच्या अंगीं असलेल्या दैवी गुणांमुळें व दैवी सामर्थ्यामुळें होय. परंतु हे दैवी गुण व हें दैवी सामर्थ्य अतिमानुष स्वरूपाचें होतें असें नसून प्रत्येक मानवामध्यें असलेल्या ऐक्य, समता, न्यायबुद्धि व अनुकंपा या सर्वसामान्य गुणांचें त्यानें आपल्या विचारांची व अनुभवांची त्यांना जोड देऊन मानवी दोषांवर त्यांचा पूर्ण ताबा राहील अशारीतीनें त्यांचें आपल्या कार्यसरणींत व दृष्टिकोणांत संवर्धन केलें होतें. Motley नांवाच्या एका इतिहासकारानें लिंकनच्या स्वभावाचें जें वर्णन केलें आहे त्यांतील पुढील वाक्यें या बाबतींत आधार म्हणून देतां येतील. " His mental abilities were large and they became more robust or the more weight was imposed upon them." ( लिंकनचें बुद्धिसामर्थ्य विशाल होतें, व त्यावर जबाबदाऱ्यांचा जसजसा अधिक ताण पडूं लागला तसतसें तें अधिक कणखर होऊं लागलें. ) " I believe him to be as true as steel and as courageous as true. " त्याची सत्यनिष्ठा पोलादाप्रमाणें कठीण होती व त्याची सत्यनिष्ठा जितकी असामान्य तितकेंच त्याचें मनोधैर्यहि असामान्य होतें. स्वतः लिंकननें आपला जीवनविषयक दृष्टिकोण एका वाक्यांत सांगून टाकला आहे. एकदां त्याच्या आयुष्याच्या अखेरच्या दिवसांत कुणी तरी त्याला म्हटलें. " why, Mr. President, you have changed your mind ! " " yes, I have. " लिंकननें उत्तर दिल, " and I don't think much of a man who isn't wiser today than he was yesterday. " ( " आपलें मत बदललें आपण " " होय. कारण जो मनुष्य कालच्यापेक्षां आज अधिक शहाणा होत नाहीं त्याच्यांत कांहींच विशेष नाहीं असें मला वाटतें. " )

## साधुवृत्तीचा मुत्सद्दी

अब्राहाम लिंकनच्या जीवनांतील श्रेयसिद्धीचें मर्म, त्याचा देवावरील अढळ व जिवंत विश्वास हें होतें व तें त्याच्या अनेक भाषणांतून व खासगी संभाषणांतून सांपडण्यासारखें आहे. अमेरिकन संस्थानांच्या अध्यक्षपदावर त्याची निवडणूक झाल्यानंतर इ. स. १८६१ च्या फेब्रुवारी महिन्याच्या अकरा तारखेस तो आपल्या घरून वॉशिंगटनला अधिकाराचीं वस्त्रें घेण्यासाठीं जाण्यास निघाला तेव्हां त्यानें आपल्या जुन्या मित्रांना व शेजाऱ्यांना उद्देशून निरोपादाखल लहानसें भाषण आगगाडीच्या डब्याच्या गॅलरींत उभें राहून केलें. त्यातील शेवटचे शब्द हे असे आहेत : " I now leave, not knowing when or whether ever I may return with a task before me greater than that which ever rested upon Washington. Without the assistance of that divine being who ever attended him I cannot fail. Trusting in Him who can go with me, and remain with you, and be everywhere for good, let as confidently







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

hope that all will yet be well. To His care commending you, as I hope in your prayers you will commend me. I bid you an affectionate farewell."

अमेरिकन लोकांना स्वातंत्र्य मिळवून देणाऱ्या जॉर्ज वॉशिंगटनला त्याच्या प्रयत्नांत जसें ईश्वराचें साहाय्य लाभलें तसें आपल्यालाहि लाभेल हा त्याचा अढळ विश्वास होता. परंतु ईश्वरावरील त्याची श्रद्धा, आपण जें कांहीं करूं त्यांत त्यानें साहाय्य व यश दिलेंच पाहिजे अशा अत्याग्रहाच्या स्वरूपाची नव्हती. या बाबतींत त्याची भूमिका कोणत्या प्रकारची होती व ती अंधश्रद्धेपासून किती दूर व आत्मविश्वासाच्या किती-जवळ होती हें त्यानें इ. स. १८६२ च्या सप्टेंबर महिन्यांत एकांतांत मनन करण्यासाठीं कांहीं विचार लिहून ठेविले होते त्या विचारांवरून कळून येतें.

" The will of God prevails. In great contests each party claims to act in accordance with the will of God. Both may be and one must be wrong. God connot be for and against the same thing at the same time. In the present civil war, it is quite possible that Cod's purpose is something different from the purpose of either party, and yet the human instrumentalities working just as they do, are of the best adaptation be effect His purpose.

(" देवाचा उद्देश काय आहे, त्याची योजना कोणत्या स्वरूपाची आहे याचें आकलन न झाल्यामुळें प्रत्येकाला वाटतें कीं आपली भूमिका न्यायाची व सत्यास अनुसरून आहे. पण जेव्हां दोन पक्षांमध्यें लढा सुरू होतो तेव्हां दोन्ही पक्षांशीं देवाची योजना संमत असणें असंभवनीय आहे. यासाठीं आपली बाजू सत्यास धरून आहे किंवा नाहीं याविषयीं निर्विकार, निरपेक्ष, स्वार्थरहित बुद्धीनें विचार करून ठरवावें.) गुलामांना स्वातंत्र्य देण्याचा जाहीरनामा लिंकननें केवळ आपल्या जबाबदारीवर व मंत्रिमंडळाचा सल्ला न विचारतां काढला तेव्हां त्यानें काढलेले उद्गार सर्वांना, सर्व प्रसंगीं मार्गदर्शक होण्यासारखे आहेत :

I am here; I must do the best I can, and bear the responsibility of taking the course which I ful I ought to take."

( जी जबाबदारी मला प्राप्त झालेल्या अधिकारामुळें मजवर येऊन पडली आहे ती पार पाडणें व त्यासाठीं माझी मनोदेवता सांगेल त्याप्रमाणें पुढें पाऊल टाकण्यासाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा करणें हें माझें कर्तव्य आहे )

" लिंकन अमर आहे; लिंकनला मृत्यूनें हिरावून नेलें नाहीं." अशा घोषणा त्याच्या १५०व्या जन्मतिथीच्या निमित्तानें ठिकठिकाणीं झालेल्या भाषणांतून व प्रसिद्ध झालेल्या लेखांतून झाल्या. लव्हजॉय नांवाच्या एका सहकारी मित्राच्या संगमरवरी स्मारकाला उद्देशून लिंकननें, " आपण हें संगमरवरी स्मारक करीत आहां हें उचित आहे; पण त्याहून अधिक टिकाऊ व भव्य स्मारक आपल्या अंतःकरणांत उभारण्याचा आपण प्रयत्न करावा." असे उद्गार काढले होते. सत्यसृष्टीला क्षणभरहि न विसरतां ध्येयसृष्टींत सदैव वावरणारा व आपले पाय जमिनीवरून सरकूं न देतां डोळे आकाशांतील ताऱ्यावर स्थिर ठेवणारा एक साधुवृत्तीचा मुत्सद्दी म्हणून अब्राहाम लिंकनचें नांव जगाच्या इतिहासांत अद्वितीय तेजानें आजहि तळपत आहे. न्याय व अनुकंपा हीं मानवजीवनांतील त्रिकालाबाधित मूल्यें म्हणजे मानवतेच्या देंठावर उगवणारीं दोन फुलें होत. आजच्या किंवा इतर कोणत्याहि काळांत व परिस्थितींत मानवास मार्गदर्शक होतील अशी त्यांची योग्यता आहे. अब्राहाम लिंकननें त्यांना आपल्या ध्येयसरणींत व कार्यसरणींत श्रेष्ठ स्थान दिलें, व म्हणून त्याच्या चरित्रांतील एका थोर जीवनादर्शाचा जिवंतपणा टिकून राहिला आहे व सदैव टिकून राहील.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कु. सत्यबाला तायल

# पंडित नेहरूनंतर काय?

" पंडित नेहरू नंतर काय ", हा प्रश्न अलीकडे बरींच वर्षे देशाबद्दल विचार करणाऱ्यांच्या पुढें आहे. आपापल्या मनोवृत्तीप्रमाणें त्याचें उत्तर देण्याचा प्रयत्न विचारी नागरिक करीत असतो. त्याची शहानिशा स्वतःच्या विशिष्ट परिस्थितीमुळें तो दुसऱ्याजवळ करीत असेलच असें म्हणतां येत नाहीं. परंतु केव्हांतरी त्याच्या मनावर अशा विचारांनीं प्रतिक्रिया घडून आली असेल असें अनुमान करण्यास कांहीं हरकत नाहीं. खुद्द पंडित नेहरू यांनीं कांहीं वर्षांपूर्वी हा प्रश्न निर्माण करून त्याचें उत्तर जाहीरपणें दिलेलें आहे. आपण कांहीं महिने तरी विश्रांति घेऊन पाहावी असें मनांत गंभीरपणें घोळत असतांना त्यांनीं अलीकडे कॉंग्रेसच्या प्रमुख सभासदांपुढें हा प्रश्न मांडून पाहिला व त्यावर निर्णयहि घेतला हें जगजाहीर आहे.

पंडितजींची प्रकृति उत्तम आहे व हिंदुस्थानांत त्यांचा द्वेष कोणी करावा असें कारणहि सांपडणार नाहीं. त्यांनीं हिंदुस्थान देशांतच नव्हे तर अनेक परकीय देशांतहि ' न भूतो न भविष्यति ' अशी लोकप्रियता मिळविली आहे. पंडित नेहरूंमुळच हिंदुस्थानाचें नांव जगभर गाजलें आहे, असें म्हणण्यांत अतिशयोक्ति नाहीं. जी कीर्ति पंडित नेहरूंनी स्वातंत्र्यपूर्वकाळांत कमावली तिच्यांत अनेक पटीनें गेल्या १० वर्षांत भर पडली आहे. महात्मा गांधींचें नांव पंडितजींनीं वाढविलें, व सद्यःकालीन युगांत महात्मा गांधींची थोरवी सांगण्याचा प्रसंग ते क्वचितच दवडतात असा प्रत्यय येत आहे. घोड्यावर बसण्यांत, डोंगर चढण्यांत व धावण्यांत आपण कोणास हार जाणार नाहीं. अशी पंडितजींनीं इतरांस ग्वाही देण्यासारखी त्यांची प्रकृति या वयांत आयुरारोग्यसंपन्न आहे व हें हिंदुस्थान वासियांचें भाग्यहि आहे, म्हणून कोणीहि त्यास उदंड आयुष्य मनापासून चिंतील यांत शंका नाहीं.

## कॉंग्रेसची ढासळती लोकप्रियता

पंडित नेहरू यांच्या लोकप्रियतेचा पारा सद्यःकालीं पुष्कळ वर चढला असला तरी ज्या देशव्यापी राजकीय संघटनेवर किंवा हिंदुस्थानच्या राष्ट्रीय कॉंग्रेसवर ते मूर्धाभिषिक्त आहेत, ती संघटना लोकप्रिय आहे किंवा तिची लोकप्रियता सारखी वाढीस लागत आहे, असें कोणास सद्यःकालीं म्हणतां येईल असें वाटत नाहीं. एके काळीं सरदार वल्लभभाई, मौलाना अबुल कलम आझाद, पंडित जवाहरलाल नेहरू, बाबू राजेंद्र प्रसाद, अशासारख्या देशधुरीणांनीं ही संघटना विभूषित केली होती. या अनेक तारांगणांच्या पुंज्यामधून एकेक देदीप्यमान तारा निखळून पडत आहे, आणि त्याची जागा इतर त्याच ग्रहमालेंतील तेजस्वी ताऱ्यांनीं प्रकाशित केली आहे, असें म्हणतां येत नाहीं. या रत्नास मोल चढावें, या मोत्याचें पाणी अधिकाधिक तळपत राहावें, अशी स्वातंत्र्यपूर्व काळांत परिस्थितीची अनुकूलता होती. परंतु गेल्या १० वर्षांत ही परिस्थिति पालटली आहे. कारागृहानें व स्वार्थत्यागामुळें व्यक्तिगत तेज उफाळून निघावें अशी काळाची रचना होती. खुद्द पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या असाधारणपणास अनेक घटना कारणीभूत झाल्या आहेत. पंडित जवाहरलाल नेहरू हे पंडित मोतीलाल सारख्या विख्यांत व श्रीमंत वकीलांचे एकुलतेएक पुत्र म्हणून एकेकाळीं जनतेस विदित झाले होते. त्यांचें शिक्षण अनेक वर्षे विलायतेंत झालें होतें. बर्नाड शॉ, जॉन ड्युई, आइन्स्टाईन, बर्ट्रॅन्ड रसेल यांच्या सारख्या जगद्वंद्य विभूतींशी प्रत्यक्ष अप्रत्यक्ष यांचे संबंध आले होते. " Bunches of letters ' सारख्या पुस्तकांत ज्यांचा नामनिर्देश झाला आहे त्यांच्या नांवाचा उल्लेख मुद्दाम केला पाहिजे असें नव्हे. आय्. सी. एस्. न होतां ऐन तारुण्यांत बॅरिस्टर होऊन हिंदुस्थानांत परत आलेले व देशाची त्यावळी अत्यंत दुर्मिळ वाटणारी पूजा करणारे



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ते अनन्य भक्त होते. महात्मा गांधींचे प्रिय-शिष्य व वारसदार म्हणून ते लोकांपुढें आलेले होते. १२ वर्षें कारागृहवास पत्करलेले हुतात्म्यासारखे ते जाज्वल्य देशाभिमानी आहेत अशी त्यांची महती होती. जगांमधील बहुतेक सगळया मुत्सद्दी लोकांवर परिणाम करणारे असे ते राजकारण धुरंधर आहेत अशी त्यांची कीर्ति सध्यांहि आहे. हे अनेक पैलु त्यांच्या असाधारण व्यक्तित्वास पडले आहेत. त्यांचें मन लहानपणापासूनच बॉय ( Buoy ) सारखें समुद्रावर तरंगत राहणारें आहे. कवि, संशोधक, लेखक, कलाभिज्ञ, तत्त्वज्ञानी, अधिकारी, प्रचारक व मुत्सद्दी यांच्या पार्श्वभूमीवर कांहीं प्रमाणांत त्यांचा उठाव झाला असल्यामुळें त्यांची थोरवी अशा अलौकिक व्यक्तित्वांत एकत्र झाल्यासारखी वाटते. तथापि गेल्या १० वर्षांत अशा अलौकिक व्यक्तित्वावर देखील पटल आलेलें दिसत आहे. सद्गुणांच्या खालीं दोष लपलेले आहेत असें सद्गुणांची चढण चढतांना बहुतेकांस स्वातंत्र्यपूर्वकाळीं वाटत होतें. सध्यांच्या शांततामय काळांत व्यक्तिगत दोषांस आकार येऊन ते डोळयांस स्पष्टपणें दृगोच्चर होतांना दिसतात. स्वातंत्र्याप्रीत्यर्थ होम चालला असतांना व डोळयांत धूर जात असतांना ऋत्विज्याच्या चेहरेपट्टीकडे व वेषभूषेकडे इतरांचें लक्ष न जाणें साहजिकच आहे. सपाट मैदानावरून चालतांना किंवा उतरणीवरून खालीं येतांना चढण्याचे कष्ट करण्याचें कोणास कारण पडत नाहीं. कोणत्या तरी कठीण अशा ध्येयाच्या मार्गानें जातांना जी मनाची तयारी करावी लागते, ती ध्येय पुढें नसतांना होऊं शकत नाहीं. व कितीहि अट्टाहास केला किंवा उपदेशाचे वळसे दिले तरी सामान्य लोकांचें हृदय अशा उपदेशानें उचंबळून येऊं शकत नाहीं.

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आपल्या लोकांचें जें जीवनमान अगदीं निकृष्ट पातळीवर आहे तें थोडेसें सुधारावें ह्या हेतूनें जनतेनें कष्ट केले पाहिजेत, त्यांनीं स्वार्थत्यागाचे धडे सारखे पुन्हां गिरविले पाहिजेत अशी अपेक्षा राज्याधिकारावर बसून कॉंग्रेसचे मंत्री व इतर धुरीण बाळगतात. डॉ. राधाकृष्णनूसारखे जगन्मान्य विद्वान पंडितहि अचंबा करतांना आढळतात कीं, चीन वगैरे देशांत जनतेच्या डोळयांत जें तेज आढळतें तें हिंदुस्थान वा रशियांत कसें आढळत नाहीं ! पंडित गोविंद वल्लभपंतांसारखे गृह-मंत्री विचारतात कीं, सीमा, प्रांतभेद किंवा प्रांतभेद या सारख्या क्षुल्लक प्रश्नांकडे लक्ष देण्यापेक्षां हिंदुस्थानचें दारिद्र्य व अज्ञान किंवा पंचदशवर्षीय योजना यांसाठीं जनता आपली पराकाष्ठा करीत नाहीं, यांत कोणता शहाणपणा आहे ? परंतु स्वतः स्वार्थत्याग न करतां इतरांनीं तो करावा अशी अपेक्षा फलद्रूप होऊं शकत नाहीं, याचा प्रत्यय गेल्या १० वर्षांत अशा मंडळींस जरूर आला असला पाहिजे. आपल्या करिता जे कष्ट करीत आहेत त्यांची चहा करावी असें बाळकडू जनतेस निःसंशय मिळालेलें आहे. परंतु उपदेश व आचार याचा मेळ जेव्हां बसलेला दिसत नाहीं तेव्हां जनता आत्मयज्ञासाठीं जागृत झाली नाहीं तर त्याचा दोष जनतेस देतां येणार नाहीं.

कॉंग्रेस ही अवाढव्य राजकीय संस्था असली तरी तिचा ध्येयवाद सद्यःकालीं जनतेच्या नजरेसमोर ढळढळीतपणानें येऊं शकत नाहीं किंवा तिचा ध्येयवाद उत्तरोत्तर नष्ट होत चालला आहे असें दिसतें. पंचवर्षीय व दशवर्षीय योजनेमधील ध्ययवाद जनतेस समजत नाहीं. कारण ध्येयवाद बोलणारे मंत्री ध्येयवादाप्रमाणें आचरण करतांना दिसत नाहींत. हें जनतेस स्पष्टपणें दिसतें. प्रांतांनिहाय ज्यांचा पूर्वी दबदबा वाटत होता त्यांची संख्या कमी होत आहे. ज्या व्यक्तीचें लोक ऐकूं शकतील अशा व्यक्ति थोड्या आहेत किंवा त्या नष्ट झाल्या आहेत. अशा परिस्थितींत सामान्य विचारी मनुष्यास वाटत कीं, नेहरूजी सारख्या थोडया लोकांचा अस्त झाल्यानंतर आमच्या देशाचें कसें होणार ? त्यांच्या मागें जनता जात आहे असें त्यास दिसत असतें, परंतु पंडितजींच्या नंतर कोणत्या व्यक्तीच्या मागें जनता जाईल हें त्यास आकलन होत नाहीं.

### भीतीचें कारण नाहीं ?

वास्तविक पाहूं जातां लोकशाहीच्या काळांत महात्मा गांधी किंवा पंडित जवाहरलाल नेहरू यां सारख्या विभूति बहुसंख्येनें निर्माण होऊं शकत नाहींत. अशा व्यक्ति कालमहात्म्यामुळें चमकलेल्या दिसतात. हें लक्षांत बाळगलें पाहिजे. अर्थात त्यांच्या निर्मितीमध्यें देशाच्या उत्थानास लागणारा चिवटपणा देशामध्यें अस्तित्वांत आहे असें सिद्ध होतें. परंतु









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विचारी मनुष्यानें आपल्या अपेक्षा व आकांक्षा परिस्थितिसापेक्ष ठेवणें हेंच शहाणपणाचें ठरतें. उगीच भलत्या आकांक्षा उराशीं बाळगून आपला तेजोभंग करून घेण्यास आपण प्रवृत्त होणें योग्य नाहीं. त्यामुळें अकारण निराशा पदरीं पडते. व आशेची उगाच पायमल्ली होते. आणि या भीतिदायक विचाराची ( Alarmist view ) खरोखर पाहिल्यास गरजहि नाहीं. महात्मा गांधी सारखें किंवा पंडित नेहरूसारखें व्यक्तिमत्त्व असणारे लोक दर पिढींत उत्पन्न होतील तरच देशाचा तरणोपाय आहे, अशी श्रद्धा ठेवणें इतिहासाच्या पुराव्यास क्वचितच धरून होईल. जर अशा व्यक्ति कांहीं पिढ्यांत सारख्या उत्पन्न झाल्या तर तो नियतीचा विशिष्ट उपकार समजला पाहिजे. तो काहीं इतिहासाचा मामुली क्रम मानतां येणार नाहीं.

पंडितजींच्या व्यक्तिमत्त्वाभोंवतीं जें तेजोवलय अस्तित्वांत होतें त्याचीहि दीप्ति १०।१२ वर्षांच्या राजकारभारानंतर कमी झाल्यास त्यांतहि कांही नवल नाहीं, प्रातिनिधिक राज्यसत्तेस ही इष्ट अशी समस्याहि ठरू शकेल. म्हणून पंडित नेहरूंनंतर अंधार पडेल अशी जी भीति कांहीं सज्जन लोकांस वाटते ती लोकशाहीस बाधा आणणारी घटना आहे असें समजलें गेलें पाहिजे. कॉंग्रेससारख्या अवाढव्य राजकीय संघटनेमध्यें १० वर्षांच्या काळानंतर पूर्वीची झळाळी दिसली नाहीं. तीमधील बहुतेक व्यक्ति स्वार्थलोलुपतेनें अधिकार-मदानें शहाणपणाच्या अभावामुळें लिप्त झालेल्या असल्या किंवा पुढील काळांतील अमूर्त अभ्युदयास स्फूर्ति देत नसल्या तर त्यांतहि घाबरण्यासारखें आहे असें वाटूं नये. ज्यांनीं सर्व जन्मभर खऱ्या खोट्या स्वार्थत्यागांत आयुष्य घालविलें त्यांनीं विश्रांतीची, वैभवाची, व्यक्तिगत मोठेपणाची कास धरली तर मोठें अब्रह्मण्य झालें असें समजण्याचें वास्तविक कारण पडूं नये. प्रश्न हाच महत्त्वाचा आहे कीं, आपल्या देशास राजकारणाच्या रंगणांत 'खो खो' सारखा डाव खेळतां येतो कां नाहीं, आपला देश मरुभूमीप्रमाणें वाळवंट बनला आहे काय ? कितीहि निराशामय विचार मनांत बाळगले तरी असें वाटण्यास वास्तव भूमिका आहे असें प्रत्ययास येणार नाहीं.

या विचारसरणीचा अंगीकार, मानीव समाधान ( Complacency ) निर्माण करण्यासाठीं करण्यांत येत आहे, असें वाटूं देण्यांत काहीं अर्थ नाहीं. उलट जे कोणी लोक प्रस्तुत परिस्थितीचें निरीक्षण करून गर्भगळित होतात त्यांची विचारसरणी शास्त्रीय नाहीं. येवढेंच नाहीं, तर ती योग्यहि नाहीं, हें दाखविण्याचा प्रस्तुत हेतु आहे.

आपल्या देशांत पन्नास ते शंभर लोक निःसंशय पहिल्या श्रेणींत अंतर्भूत होतील अशा योग्यतेचे आहेत असें खास म्हणतां येईल. ते कठीण परिस्थितींत देशाभिमानाच्या भावनेनें एकत्र येऊ शकणार नाहींत असें त्यांचें निदान केल्यास त्यांना फार कमीपणा देण्यासारखें तें होणार आहे.

### अन्य पर्यायांची शक्यता

जे कोणी प्रामाणिकपणें असें समजतात कीं पाकिस्तानांत ज्याप्रमाणें अयूबखान पुढें आले तशीच हिंदुस्थानाची देखील परिस्थिति आहे, त्यांना व्यवस्थित रीतीनें देशस्थितीचा विचार करण्याची संवय नाहीं असें मानलें पाहिजे. सेनानीच्या हातांत हिंदुस्थान देश देण्यास आपले लोक तयार होतील, इतके ते अनेक वर्षांच्या गुलामीनें हतबल, निपचीत, नादान झाले आहेत, असें मानण्यासारख्या घटना येथें घडत आहेत असें समजण्याचें कारण नाहीं. जर अनेक मुंघडा हिंदुस्थानांत गुप्तपणें वावरत असले तर त्यांची खबर घेण्यास काहीं फिरोज गांधी व छगला बसलेले आहेत असें मानलें पाहिजे. नवीन निवडणुकींत कॉंग्रेसचा बहुतांशीं पराजय होऊन दुसरे प्रतिनिधि निवडून आले तर देशाचा घात ते करतील असें समजण्यास जागा नाहीं. पुढच्या निवडणुकींत कॉंग्रेस हरली व पंडित नेहरूहि प्रधान मंत्री राहिले नाहींत तर देशांत घोटाळा माजेल अशी भावना करून घेण्याचें काहीं कारण नाहीं. एका राजकीय पक्षास बाजूस सारून दुसरा राजकीय पक्ष पुढें येतो, त्यास प्राधान्य मिळतें, हें देशाच्या प्रगतीच्या दृष्टीनें काहीं अनिष्ट नाहीं. कॉंग्रेससारखा बलिष्ठ पक्ष देशांत दुसरा नाही हें सद्यःस्थितींत खरें आहे. पण निवडणुकीनंतर असा पक्ष बनविणें फारसें कठीण नाहीं. किंवा श्रीयुत घोषासारखे जनसंघाचे अध्यक्ष नुकतेच म्हणाले त्याप्रमाणें देशास सर्वपक्षीय सरकार बनविणें अशक्य









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कोटींतील गोष्ट नाहीं. देशापुढें कठीण समस्या उभी राहिली तर तीन प्रकारचे मार्ग आपल्यास मोकळे राहूं शकतात. देश सेनानींच्या हातीं सोपविणें, सर्वपक्षीय सरकार बनविणें, किंवा कोणता तरी एक पक्ष बलाढय करणें असे तीन पर्याय ते आहेत. हिंदुस्थानांत हिंसक किंवा अहिंसक क्रांति पुढें मागें घडून येईल अशीं चिन्हें दिसत नाहींत. धीमेपणा आपल्या स्वभावांत चांगला रुजला आहे. त्यामुळें रेल्वेच्या गाड्यांत अतोनात गर्दी लोटली, धान्यभाव मनस्वी कडाडले, दुर्भिक्ष भयंकर माजलें, कॉलेजामध्यें मार्कांच्या व जागेच्या संबंधीं ढळढळीत पक्षपात झाले. आणि इतर अन्याय स्पष्टपणें सर्वांच्या नजरेस आले तरी आमचें पित्त खवळावें व सनदशीर मार्गाच्या सीमारेषेच्या पलीकडे आम्ही जावें असा आमचा स्वभाव नाहीं. गेलीं दीडशें वर्षें कांहीं थोड्या परकीयांच्या अमलाखालीं आम्ही खुषीनें नाखुषीनें काळ घालविला आहे. महात्मा गांधींची अहिंसक म्हणविणारी चळवळ हिंदुस्थानांत सुरू होऊन हजारों लोक त्यांनी कारागृहांत पाठविले, तेव्हां कोठें या अवाढव्य देशांत थोडी बहुत अहिंसक क्रांति झाली असें श्रेय घेण्यास कांहीं अल्पसंख्य लोक तयार झाले. हिंदुस्थानांत अनेक प्रांत आहेत. अनेक भाषा लोक बोलतात. कोट्यवधि हरिजन व गिरिजन आहेत. हजारोंनीं मोजण्यासारखे जातिभेद आहेत. म्हणून हिंसक किंवा अहिंसक क्रांति हिंदुस्थानांत पुन्हां घडून येणें फार मुष्किलीचें काम आहे. कोणत्या तरी बाबतींत अन्यायाची सार्वत्रिक चीड निर्माण करून जनतेस वाटेल त्या कष्टासाठीं तयार करणें हें हिंदुस्थानांत अतिशय दुष्कर कार्य आहे. कांहीं वर्षांपूर्वी बंगाल्यांत दुष्काळानें कहर माजला होता. लाखों लोक मृत्युमुखीं पडले. दुसऱ्या महायुद्धामुळें परिस्थितिहि क्रांतीस अनुकूल होती, असें म्हणण्यासारखें आहे. सहज अस्वस्थता माजूं शकेल असा बंगाली लोकांचा भावनावश स्वभाव आहे असें लोक म्हणतात. परंतु दुष्काळग्रस्त लोक क्रांतीस तयार होत नाहीत असें आपल्या प्रत्ययास आलें आहे. क्रांतीसाठीं दुसऱ्याच अनेक कारणांची गरज आहे. क्रांतीचा ऊहापोह करण्याचें हें स्थळ नाहीं, म्हणून क्रांतीची चिकित्सा करीत बसणें योग्य होणार नाहीं.

हिंदुस्थानांत हिंसक किंवा अहिंसक क्रांति होणें दुरापास्त आहे. सेनानींच्या हातांत देशाचें सुकाणु देण्यास कांहीं झालें तरी देशांतील बहुतेक विचारी लोक तयारी दाखविणार नाहींत. मग पंडित नेहरू आणि त्यांच्या पाठीमागें असणारी कॉंग्रेस उतरणीवरून सध्यां घसरत चालली तरी देशांत अस्वस्थतानिर्माण होऊन घोटाळा माजेल असें म्हणतां येणार नाहीं. देशांतील साम्यवादी पक्ष व त्यांचे नंबुद्रीपादांसारखे अनेक साथी परिस्थितीशीं स्वार्थत्यागानें झुंजण्यास तयार आहेत. आणि हिंदुस्थानांतील असंख्य गरीब लोक त्यांची पाठ राखण्यास तयार होणार नाहींत अशीं लक्षणें दिसत नाहींत. हजारों किंवा लाखों रुपयांची लांच देऊं केली तरी आपला पक्ष सोडण्यास कांहीं साम्यवादी तयार नाहींत असें आपण वर्तमानपत्रांत वाचतों. व अशी परिस्थिति असल्यास ती देशहिताच्या दृष्टीनें आशादायक आहे असें निश्चयानें म्हणतां येण्यासारखें आहे. तीन हजार लोक ज्यांत कांहीं महत्त्वाची मंडळी व चांगल्या स्त्रिया आहेत. दूरप्रांतीं जाऊन थंडीवाऱ्यांत आपल्या उद्दिष्टासाठीं ठाण मांडून बसतात हें दृश्य हिंदुस्थानची पिछेहाट दाखवूं शकत नाहीं. हजारों हरिजन हिंदुस्थानांत व महाराष्ट्रांत आपल्या सहस्रावधि वर्षांचा जुना मायधर्म सोडून बुद्धधर्माचा स्वीकार करतात. हें हिंदुस्थानचें परागति दर्शक चिन्ह आहे असें निःपक्षपाती विचारी मनुष्य म्हणूं शकणार नाहीं.

हिंदुस्थानवर परकीयांचें आक्रमण झालें तर सर्व जनता एकत्रित होऊं शकेल अशी खात्री सर्व लोकांस आहे. बंगाल्यामध्यें नेहरू-नून करारामधील कांहीं थोड्या जागेंसाठीं सर्व निरनिराळया पक्षांचें बंगाली प्रतिनिधि या मुद्यावर एक झाले. मग परकीय आक्रमणाचे वेळीं तीव्रमतभेदाचे सर्व प्रश्न लोक बाजूस सारतील अशी उमेद प्रत्येक देशभक्तास वाटलीच पाहिजे. तरीदेखील हिंदुस्थानवासीयांची देशभक्ति केवळ अभावात्मक ( negative ) आहे. ती भावात्मक होईल तेव्हां आपल्या देशास फार उज्ज्वल भवितव्य प्राप्त होईल असें विचारी नागरिकास वाटल्याखेरीज राहत नाहीं. ज्याप्रमाणें परकीय आक्रमण हें हिंदुस्थानच्या सर्व जनतेस एका बिंदूवर केंद्रित करण्यास भाग पाडणारें आहे, त्याचप्रमाणें प्राति-



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निधिक तत्त्व हेंदेखील सोडण्यास आपण तयार होऊं असें म्हणतां येणार नाहीं. प्रातिनिधिक तत्त्वांतील समानतेशीं ( equality ) जातिभेदांमुळें आपण एक-जीव होऊं शकत नाहीं. आपल्या जातिभेदाच्या, वर्णा-श्रमाच्या जुन्या संस्कृतीवर प्रतिनिधिक तत्त्वामधील साम्यता बाहेरून चिकटविली आहे असें आपणांस दिसतें. व तें रास्तहि आहे. पण आपली देशभक्ति जशी सद्यःस्थितींत अभावात्मक ( negative ) आपल्यास भासते तसेंच प्रातिनिधिक तत्त्वाबद्दल आपलें प्रेम अभावात्मक आहे, अशी आपली धारणा आहे, असें आपल्यास आढळून येईल. आपल्या घटनेंत अंत-र्भूत असलेलें प्रातिनिधिक तत्त्व आपल्यापासून हिरावून घेण्याचा प्रसंग आल्यास त्यास सर्व जनता चिकटून बसेल, आणि या मुद्यावर आपण सर्व एक आहों अशी खात्री पटवील असें, विचार केल्यानंतर म्हणतां येण्या-सारखें आहे. खुद्द रामस्वामी नायकर यांसारखे हिंदी-द्वेष्टे द्रविडीस्थानचे पक्षपाती, व जुनी सनातन संस्कृति सर्वस्वी बुडवूं पाहणारे लोकनायक हिंदुस्थानाचा लोभ सोडण्यास तयार होणार नाहींत, मग इतरांची गोष्टच बोलावयास नको. त्यांचे अनेक अनुयायी आज कांहीहि म्हणत असोत. परंतु वेळ तशी आल्यानंतर किती अनुयायी हिंदुस्थानचें प्रेम पायाखालीं तुडविण्यास तयार होतील ही फार मोठी संशयास्पद बाब आहे. आपलें मन ही एक अजब घटना आहे. प्रसंगविशेषी त्या मनाचे धागेदोरे मनुष्याच्या प्रत्ययास येतात. हिंदुस्थान देशाची आपली भावना किती प्रमाणांत खोल गेली आहे आणि प्रातिनिधिक तत्त्व नवीन असलें तरी त्यानें आपल्या मनांत कसें घर केलें आहे. याची जागृति वेळप्रसंगीं प्रत्ययास येऊन आपल्यासच आश्चर्य वाटेल इतकी तिची तीव्रता आहे.

### भावनात्मक ऐक्याची गरज

राजकीय पुढारी व त्यांची संघटना यांमध्यें अवयवी व अवयव असा संबंध असला पाहिजे. तीमध्यें सेंद्रियता निर्माण झाली असली तरच कोणतीहि राजकीय संघटना टिकावूं होऊं शकते. भावनात्मक एकतेचा जयघोष पंडित नेहरू व पंडित गोविंद वल्लभ पंत करीत आहेत. परंतु त्यांच्या अनुयायांस या भावनात्मक एकतेची पर्वा आहे असें कॉंग्रेसच्या वाटचालीवरून म्हणतां येण्यासारखें नाहीं. म्हणूनच कॉंग्रेसची संघटना केवळ यांत्रिक झालेली आहे असें अनेकास भासतें. ती मागें पडून जी संघटना देशांत भावनात्मक ऐक्य निर्माण करील. ती तिची जागा घेऊं शकेल असें म्हटल्यास तें चुकीचें ठरणार नाहीं.

आपल्या देशांमध्यें स्वतःच्या दुर्गुणांचें भान असावें, तिनें आपण बेचैन व्हावें, हें अगदीं जरूरीचें आहे. अवास्तव समाधानी राहून कोणताहि भौतिक उत्कर्ष साधूं शकत नाहीं. देशांत भ्रष्टाचारास रान मोकाट सुटलेलें असावें असें कोणासहि वाटणार नाहीं आपल्यामध्यें जातिभेदानें धुमाकूळ मार्जावलेला नाहीं असें नाहीं. आपले प्रौढ विद्यार्थी फार उच्छृंखलपणा व थिल्लरपणा दाखवूं लागले आहेत. स्वातंत्र्यपूर्वकालांत समाजकार्याबद्दल जशी स्त्रिया बेपर्वाई दाखवीत, त्याच-प्रमाणें स्वातंत्र्यांत ही नवीन जबाबदारी अंगावर पडली असली तरी त्या तशाच घोरत पडल्या आहेत. अप्रामाणिकपणा सर्व समाजाच्या थरांत अधिकाधिक पसरत आहे, असें बोललें जातें. कर्तव्यनिष्ठेचा व कष्टसाध्यतेचा अभाव सगळीकडे भासत आहे. असे आपले अनेक दुर्गुण आहेत. परंतु आपले दोष सर्षप-मात्र असले तरी ते बिल्वमात्र करून दाखविणाऱ्या-पासूनहि आमचें हित नाहीं म्हणून ' पंडित नेहरू नंतर काय ' अशा प्रश्नामधील अर्थानी अवास्तव भीति घेऊन आपलें मन गडबडून जाण्याचें कारण नाहीं. देशाची प्रगति प्रसंगोपात्त रास्तप्रमाणांत होत आहे अशी खात्री आम्ही बाळगल्यानें आमचा शेवटीं फायदा होणार आहे.

---



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कु. मन्दाकिनी आचार्य

# ईश्वराचें अस्तित्व

## ईश्वराचें अस्तित्व

जीव आणि संवेदनारूपानें जाणतां येणाऱ्या जगताकडे दृष्टिक्षेप केला असतां जगताच्या कर्त्याबद्दल निरनिराळे प्रश्न मनाची पकड घेतात. सृष्टींतील ही योजकता, व्यवस्थाबद्धता व सुसूत्रपणा बघितला म्हणजे ह्या सर्व गोष्टींचा कुणीतरी कर्ता असलाच पाहिजे अशा प्रकारचे विचारतरंग मनांत उठतात.

अशा या कर्त्याविषयीं– ज्यालाच आस्तिकवादी लोक ईश्वर म्हणतात– त्याविषयीं फार पुरातन काळापासून अनेक मतें आहेत व विद्वानांत त्याविषयीं वाद चालू आहेत. हिंदु संस्कृति, जे लोक वेदांचें प्रामाण्य मान्य करितात त्यांना आस्तिक समजते, व त्यांचें प्रामाण्य अमान्य करणाऱ्या लोकांना नास्तिक समजते. पाश्चात्य विद्वानांनीहि याविषयीं निरनिराळे पंथ निर्माण केले आहेत.

ईश्वराचें अस्तित्व अथवा अनस्तित्व कांहीहि मान्य करावयाचें असलें तरी दोन्ही वादांचें म्हणणें काय आहे हें पाहून, त्यावर साधक बाधक विचार करून नंतरच बुद्धीला पटणाऱ्या मताचा स्वीकार करणें योग्य ठरेल. ईश्वरवादी कोणत्या प्रमाणांच्या आधारावर त्याचें अस्तित्व मान्य करितात व निरीश्वरवादी कोणत्या कारणामुळें तें मानीत नाहींत हें पाहाणें आवश्यक आहे. यासाठीं प्रथम आस्तिकवादी लोकांच्या मनांत ईश्वराच्या कल्पनेचा उगम कसा झाला, परमेश्वराच्या विषयींच्या कल्पना कोणत्या स्वरूपाच्या आहेत. त्याचें पृथक्करण कोणत्या अंशांत करितां येतें हें जाणण्याकरितां ईश्वराच्या अस्तित्वाकरितां पुराव्यादाखल दिलेलीं निरनिराळीं प्रमाणें व मतें पाहाणें आवश्यक आहे. म्हणून त्याकडे वळूं.

## पुरावे :–

( १ ) God as a creator of the world. जगताचा निर्माता परमेश्वर :– जगत् ही निर्मित वस्तु आहे, असें आपण तेव्हांच म्हणूं शकूं कीं जेव्हां ती वस्तू कुणीतरी निर्माण केली आहे, व ती वस्तु निर्मित आहे म्हणूनच अस्तित्वांत आहे. म्हणून निर्माता मानला पाहिजे.

( २ ) Ontological argument. सत्ताशास्त्रीय प्रमाण :– ज्या अर्थीं मी अपूर्ण आहे व माझ्या मनांत पूर्णाची कल्पना आहे व कल्पनेला अस्तित्व असतें त्या अर्थीं पूर्ण अस्तित्वांत आहे. संपूर्ण म्हणजेच ईश्वर म्हणून तो निःसंशय आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. असें हें प्रमाण मानणाऱ्या डेकार्ट्सचें म्हणणें आहे. तो पुन्हां म्हणतो : (१) $\Delta$ त्रिकोण म्हटला कीं त्याच्या तीन्ही कोनांची बेरीज दोन काटकोन असते. तद्वतच पूर्ण वस्तु म्हटली कीं तिला अस्तित्व आलेंच. म्हणून ईश्वर आहेच. तसेंच ( २ ) मी अपूर्ण असल्यामुळें मला जसें हवें तसें होतां येत नाहीं. अर्थात अपूर्ण असा मी माझा जनक होऊंच शकत नाहीं. शिवाय ही पूर्णाची कल्पना पूर्णाकडूनच माझ्यांत घातली गेली असली पाहिजे कारण कारणांत कार्येणा इतकें तरी बल असलेंच पाहिजे. तसेंच ( ३ ) मी माझें कारण नाही कारण मी अपूर्ण आहे. मी जर पूर्ण असतों तर मला मी पूर्ण बनविल असतें. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. शिवाय माझें संरक्षण करण्यास मी समर्थ नाहीं. ( निरपेक्षपणें ) अर्थात असा संरक्षक असला पाहिजे व तो म्हणजेच ईश्वर.



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

या नंतर जर्मन तत्त्ववेत्ता कान्ट यानें या डेंकार्ट्सच्या प्रमाणावर टीका केली व त्यानें सांगितलेल्या पद्धतीनें परमेश्वराचें अस्तित्व सिद्ध होत नाहीं असें सांगितलें. कान्ट म्हणतो. डेकार्ट्सनें ईश्वराचा सिद्धांत सिद्ध करण्यासाठीं विशेष माहिती कांहीच सांगितली नाहीं. म्हणून तें प्रमाण होऊं शकत नाहीं. ईश्वर पूर्ण आहे म्हणजेच ईश्वर असणारी वस्तु आहे असा अर्थ होतो. पण त्यांत ईश्वरसिद्धि न होतां तो गृहीत धरला जातो.

शिवाय परमेश्वराच्या अस्तित्वाचा अन्तर्भाव केवळ पूर्णतेच्या कल्पनेंतच करितां येत नाही. कारण अस्तित्व हें कल्पनेनें वस्तूंत घालतां येत नाहीं. कोणतीहि गोष्ट अनुभविल्या शिवाय सिद्ध होत नाहीं. ईश्वर आहे असें म्हणावयाचें असेल तर तो सिद्ध केला पाहिजे.

ईश्वराचें अस्तित्व कान्टला मान्य नव्हतें असें मात्र यावरून म्हणतां येत नाहीं. त्यानें वेगवेगळया पद्धतीनें तें सिद्ध केलें. त्याला डेकार्टसची पद्धत मान्य नव्हती. कान्ट म्हणतो, - भौतिक शास्त्रें ज्या दृश्यांचा विचार करितात. त्या बाह्येन्द्रिय पदार्थाच्या बाबतींत सत्यासत्यतेचा निकाल बुद्धीला चटकन करितां येतो पण ईश्वर इन्द्रियगोचर नाहीं. तेव्हां इन्द्रियगम्य पदार्थांच्या संबंधाच्या कसोट्या उपयोगांत आणणारी बुद्धि ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करूं न शकल्यास आश्चर्य कसलें.

Ontological argumeut प्रमाणेंच कान्टनें आणखी दोन प्रमाणांना विरोध केला. तीं प्रमाणें आपण पाहूं:—

( १ ) Cosmological विश्वमूलक प्रमाण: जग हें स्वतः कार्यरूप आहे. तें स्वतःच कारण होऊं शकत नाहीं. तसेंच हें सर्व अस्थिर, चंचल व परिच्छिन्नित आहे. तेव्हां त्याच्याप्रमाणें कांहीं अपरिच्छिन्न व स्थिर असें तत्त्व मानणें भाग आहे. असें जें देशकाल परिस्थिति निरपेक्ष व अस्तित्वयुक्त तत्त्व तोच परमेश्वर होय. व तीच अधिष्ठान वस्तु होय.

यावर कान्ट म्हणतो. - परंपरागत कल्पनेवर हें आधारलेलें आहे. मूळ आधारच दुर्बल आहे. जर कार्य-कारणवाद लावायचा असेल तर तो परमेश्वरालाहि लावावा. व मग ईश्वराचें कारण काय. हा प्रश्न अगदीं साहजिक आहे. पण असें जर आपण करीत राहिलों तर अनंताचें आदिकरण शोधावें लागेल. व तें अशक्य आणि हास्यास्पद ठरेल. पण अनंताला आदिकरण आहे या तत्त्वाचा त्याग केला तर जगांतील प्रत्येक गोष्टीला कारण आहे हें मान्य करितां येणार नाही किंवा जगताला कारण असलेला परमेश्वर त्या कार्यकारण वादाला अपवाद आहे असें मानावें लागेल. पण या नियमाला परमेश्वर हा एक व एकटाच अपवाद आहे हें आपणांस कसें समजेल ? तें जोंपर्यंत आपण सिद्ध करूं शकत नाहीं तोंपर्यंत जगताला कारण आहे असें आपण म्हणूं शकत नाहीं. म्हणून ईश्वर जगतांचें कारण म्हणून मानूं शकत नाहीं.

(2) Theoligical argument विश्वरचना हेतुमूलक: हें प्रमाण Cosmological argument वर आधारलेलें आहे. आपण बाग लावतों त्याप्रमाणें रानांतील लावणारा, त्यांची जोपासना करणारा कुणीतरी असलाच पाहिजे, त्याशिवाय हें रचना–चातुर्य व ही व्यवस्था असणें शक्य नाहीं. सूर्योदय, सूर्यास्त, ऋतु, हंगाम हें चक्र चालविणारा कुणीतरी असलाच पाहिजे व तो म्हणजे ईश्वर.

कान्ट या प्रमाणास थोडा मान देतो पण वरील दोन्हीं मतें त्याच्या दृष्टीनें दोषपूर्ण अशीं आहेत. तो म्हणतो, हें प्रमाण सबळ नाहीं. कारण जगतांत मुळांत हेतुपूर्वक रचना नाहीं व जी थोडी आहे, त्यावरून जगत्कर्ता कुणी असावा असें सिद्ध न होतां कोणी एकादा कारागीर आहे, असें फार तर म्हणतां येईल. परमेश्वर जर शक्तिमान असता तर त्यानें









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जगत् अपुरें ठेविलें नसतें. पण कारागीर समोरील पदार्थांना इच्छित स्वरूप देण्याचा प्रयत्न करितो त्यांत त्याला नेहमी यश येतेंच असें नाहीं. तात्पर्य : रचनाकाराचें अस्तित्व जरीं सिद्ध झालें तरी सर्व शक्तिमान व सर्वज्ञ अशा परमेश्वराचें अस्तित्व सिद्ध होत नाहीं.

यात्रमाणें कान्टनें या वरील तिन्हीं पुराव्यांतील दोष दाखवून ते ईश्वरसिद्धि करण्यास अपुरे आहेत हें सिद्ध करून दिलें. तरीसुद्धां परमेश्वर आहेच असें त्यांचें ठाम मत होतें. त्यानें त्यासाठीं जें प्रमाण दिलें त्यास Moral argument– नैतिक प्रमाण असें म्हणतात. हें प्रमाण त्यानें Critique of Practical Reason या पुस्तकांत दिलें आहे. या पुस्तकांत त्यानें असें प्रतिपादन केलें आहे कीं, तत्त्व-विचारांत आपण आपल्या बुद्धीला जशी मान्यता देतों. तशीच आपल्या सद्भावनांनाहि देणें आवश्यक आहे. एकाद्या बाबतींत बुद्धि अपुरी पडली तर सद्भावनांना प्रश्न विचारणें अयोग्य ठरणार नाहीं, तर ते न विचारणेंच अप्रशस्त होईल. सद्भावना व बुद्धि यांना जीवनांत सारखेंच महत्त्वाचें स्थान आहे. तात्पर्य : विज्ञानशास्त्रांत कार्य करणाऱ्या बुद्धीला ईश्वराचें अस्तित्व व अमरत्व सिद्ध करितां आलें नाहीं, तरी निराश होण्याचें कारण नाहीं. नीति-विषयक भावनांच्या जोरावर ईश्वराचें अस्तित्व आणि अमरत्व सिद्ध करितां येणें शक्य आहे. हा पुरावा असा– माझ्या नीतिविषयक भावनांना प्रश्न विचारल्यास मला ईश्वराचें अस्तित्व मान्य करावेंच लागतें. कारण सद्गुण व सुख हीं एकास्पद असावींत असें माझी बुद्धि मला सांगते. पण व्यवहारांत ह्याच्या अगदीं उलट प्रकार दृष्टीस पडतो. " अहिंसा– सत्यमक्रोधः " हीं तत्त्वें माहीत नसलेला पण ' कामं आश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विताः' असे लोक कृष्ण-कृत्यें करूनसुद्धां समाजांत मानाचें स्थान मिळवितात. श्रेष्ठ म्हणून गणले जातात आणि ऐषारामांत लोळत असतात. याउलट सदैव सन्मार्गाचा अवलंब करणारे कितीतरी महाजन दुःखानें पीडलेले व दारिद्र्यानें नाडलेले दृष्टीस पडतात. कान्ट म्हणतो, जगांतील ही उफराटी रीत दृष्टीस पडली. म्हणजे सदाचार, सद्गुण, यापेक्षां दुर्गुण व दुराचार यांचाच मार्ग चांगला आहे कीं काय असा प्रश्न पडतो. पण अर्थात् माझी सद्भावना– किंवा तिला आपण नैतिक बुद्धि म्हणू– ती मला त्याचें उत्तर सद्गुणाच्याच बाजूनें देते. दुराचार व दुर्गुण यांना ती सदैव त्याज्यच मानते. तेव्हां सद्गुणाला श्रेष्ठ स्थान द्यावयाचें असेल तर तें श्रेष्ठस्थान ज्या परिस्थितींत मिळतें अशी परिस्थिति मान्य केली पाहिजे. म्हणजेच दुर्जनां-च्या दुष्कृत्याला शिक्षा व सज्जनांच्या दुष्कृत्याला जेथें बक्षिस मिळतें अशी स्थिति मान्य केली नाहीं तर दुर्गुण सोडून सद्गुणाचें आचरण करणारालां कांहीं प्रयोजनच राहाणार नाहीं. ज्या अर्थीं दुर्गुणांचा त्याग करून सद्गुणांचें आचरण करावें अशी आपली नैतिक भावना आपल्याला निश्चयानें सांगते आणि ज्या अर्थीं सद्गुणांचीं फळें आपणांला या जन्मांत मिळत नाहींत त्या अर्थीं तीं परलोकांत मिळत असलीं पाहिजेत. म्हणून परलोकाची स्थिति मानली पाहिजे. पण केवळ परलोक मानल्यानें कार्य पूर्ण होत नाहीं. परलोकांत पावित्र्याची बाजू घेणारी कुणी तरी शक्ति तिथें असलीच पाहिजे. सदाचाराला बक्षीस व दुराचाराला शिक्षा देणारा कुणीतरी जबाब-दार असला पाहिजे. कर्म जड आहे तेव्हां कर्माध्यक्ष म्हणून ईश्वर मानलाच पाहिजे. याप्रमाणें कान्टनें ईश्वराची सिद्धि केली. या प्रमाणांवर सुद्धां निर-निराळे आक्षेप घेण्यांत आले. सद्गुणाला बक्षीसच कां द्यावें असा प्रश्न विचारला जातो. पण हा प्रश्न आंबा गोड कां व कारलें कडू कां या सारखाच आहे.

येथपर्यंत पाश्चात्यांची ईश्वराच्या अस्तित्वा-विषयींची मतें पाहिलीं; आतां आर्यदर्शनांतील ईश्वर-कल्पना पाहूं.




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

### योग व सांख्य

यांचे पुरस्कर्ते पातंजली व कपिल हे होत. त्यांनाच सेश्वर व निरीश्वर सांख्य असें संबोधतात. सांख्य ईश्वर मानीत नाहींत असें मानलें जातें. सेश्वर सांख्य– जगताचें आदिकरण म्हणून परमेश्वर मानीत नाहींत तर ( १ ) ते म्हणतात, व्यवहारांत एकापेक्षां दुसरा शहाणा व सरस दिसतो हें आपण मान्य केलें आणि ज्ञात्यांची ओळ तयार केली तर कुणींतरी प्रथम क्रमांकाचा कल्पिलाच पाहिजे. कारण तर-तम भावाच्या पदार्थांना सुद्धां सीमा आहेच. जो कुणीं ज्ञात्यांतील श्रेष्ठतम ठरला जाईल तोच ईश्वर होय. ( २) जगांत एकानें दुसऱ्याला ज्ञान देण्याचा संप्रदाय आहे. याचा कुणीं तरी आद्य प्रवर्तक असलाच पाहिजे. तोच ईश्वर होय.

### न्याय व वैशेषिक

नैय्यायिक ईश्वराला जगताचें निमित्त व कारण मानतात. आदान कारण परमाणू आहेत. परमाणूंचा संयोग होऊन जगत् निर्माण होण्याला ज्यांची इच्छा कारणीभूत होते तो परमेश्वर. जीव व ईश्वर यांत फरक आहे. जीवाचें ज्ञान अल्प व अनित्य असतें. परमेश्वराचें ज्ञान नित्य व अनंत असतें.

### वैशेषिक

वैशेषिक हे अनुमानानें ईश्वरसिद्धी करितात. घटपटादींचा कर्ता असतो. पृथ्वी ही एक कार्यरूप घटना आहे तेव्हां तिचा कोणी तरीं कर्ता असला पाहिजे. अल्पशक्तिमान असा जीव कर्ता होऊं शकणार नाहीं. म्हणून तो सर्व शक्तिमान असला पाहिजे.

### नैय्यायिक

अनुमानानेंच सिद्धी करितात पण वेगळया रीतीनें.
“ ईश्वरः कारणं पुरुषकर्माफल्य दर्शनात् ”
मनुष्यकर्म करितो पण त्याला हवें तसें फळ मिळतेंच असें नाहीं. कर्मफलाच्या बाबतींत तो पराधीन असतो. तेव्हां ज्याच्या स्वाधीन त्याच कर्मफल आहे तो ईश्वर. जीवाचें अचेतन कर्म सचेतनाच्या सत्तेशिवाय व्यक्त होत नाहीं. म्हणून असा हा सचेतन सर्वज्ञ आहे.

सर्व प्रकारच्या पदार्थाचें कारण कार्य करण्यास प्रथम प्रवृत्त करणारा असा हा परमेश्वर आहे असें न्यायकुसुमाञ्जलींत निरनिराळीं प्रमाणें देऊन सांगितलें आहे.

### पूर्वमीमांसा

जगताचें आदिकरण परमेश्वर आहे असें मानीत नाहींत. जगत् प्रवाह रूपानें अनंत आहे. ईश्वरपर श्रुती सर्व अर्थवादरूप आहे असें समजावें असें यांचें मत आहे.

### उत्तरमीमांसा

( वेदान्त ) : जगताचें कारण चेतन आहे असें मानतात. पण हें चैतन्य ब्रह्म आहे कीं सगुण परमात्मा आहे याविषयीं निरनिराळीं मतें आहेत. ईश्वर हाच एक सत्य आहे, बाकी सर्व भास आहे, माया आहे, व जगताचें अभिन्ननिमित्त उपादान असा ईश्वर जगताचें कारण आहे. कोळी आपल्या पोटांतून जाळें निर्माण करितो त्याचप्रमाणें परमेश्वर व जगत् यांचा संबंध आहे. कोळयाचे ततू हें उपादान कारण व ते विणण्याचें कौशल्य हें निमित्त कारण आहे. तो ( ईश्वर ) दोन्हीहि आहे. जीव तमोगुण प्रधान असल्यामुळें दुःख व क्लेश भोगतो. परमेश्वर शुद्ध सत्वात्मक आहे. तो उपाधीशीं तादात्म्य पावत नाहीं म्हणून मुक्त असतो.

### रामानुजाचार्य व इतर आचार्य

ईश्वर हा ब्रह्मस्वरूपी आहे, हें यांना मान्य नाहीं. सर्वोत्कृष्ट गुणसंपन्न असा तो ईश्वर असें ते मानतात. निर्गुण निराकार ब्रह्म न मानतां सगुण पुरुषोत्तम मानतात. रामानुजाचार्य म्हणतात, जीव व जगत् यांचा जसा अंश-अंशी संबंध आहे तसाच जीवजगत् व ईश्वर यांचा आहे. ईश्वर हा सेवक जीवाचा सेव्य आहे. शरणागताला शरण्य आहे. जीवाला आपलें



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ज्ञान झालें व ईश्वराची कर्मरूप उपासना केली म्हणजे तो मुक्त होतो. विष्णु, लक्ष्मी, वैकुंठ हे नित्य व अनादि आहेत.

**वल्लभाचार्य**

परमेश्वर हा सगुण, निर्गुण दोन्हीं रूपांत आहे. त्याच्या अनंत शक्तींपैकीं माया ही एक शक्ति आहे. जीवांत आनंद, गुण सुप्त स्थितींत असतात म्हणून त्याला दुःखें भोगावीं लागतात. जीव हा परमेश्वरी अंश आहे. ईश्वराची सेवा हे ध्येय. व हें ध्येय भक्तिमार्गानें, पुष्टीमार्गानें किंवा अनुग्रह मार्गानें असें वल्लभाचार्यांचें मत होतें.

द्वैत व अद्वैत मताप्रमाणें परमेश्वर व जगत् यांतील संबंध निरनिराळया प्रकारचा आहे. ईश्वर जगताचे रूपानें आपणच आपणास प्रसवला असें अद्वैती तत्त्वज्ञ मानतात. द्वैती सगुण परमात्मा व त्याहून भिन्न असें जगत् दोन्हीं मानतात यांप्रमाणें प्रत्येकाच्या ईश्वराच्या कल्पना भिन्न आहेत असें मानलें तरीं त्यांचें अस्तित्व सर्वांना मान्य आहे. हीं सर्व ईश्वरवादी लोकांचीं मतें झालीं; आतां निरीश्वरवादी किंवा नास्तिक लोक काय म्हणतात याकडे पाहूं.

प्रथम नास्तिक कुणाला म्हणावयाचें हें पाहूं. एखादा मनुष्य धार्मिक गोष्टींत सुधारणाप्रिय असला तर त्याला नास्तिक संबोधतात. पण तें बरोबर नाहीं. सुधारणाप्रिय मनुष्याला जो नास्तिक म्हणेल तोच नास्तिक ठरतो. पृथ्वीच्या पाठीशीं सुजाण अशी शक्ति नाहीं असें जो प्रतिपादन करतो तोच नास्तिक. पूर्वी आपण पाहिलें आहे कीं सांख्यांना निरीश्वरवादी म्हणतात. परंतु माणसाला कर्म असतें व त्या कर्मानुसार त्याला अमुक परिणाम भोगावेच लागतात अशी योजना आहे हें सांख्यांना मान्य आहे. सृष्टीची मांडणी पद्धतशीर करणारी शक्ति आहे असें मान्य करतात. ते ही शक्ति मान्य करीत असल्यामुळें नास्तिक ठरत नाहींत.

याप्रमाणें सुजाण शक्तीचें अस्तित्व अमान्य करणारे म्हणजेच नास्तिक लोक काय म्हणतात हें पाहूं. ईश्वर नाहीं, हें सिद्ध करण्याकरितां नास्तिक निरनिराळे पुरावे देतात. ते म्हणतात –

(१) ईश्वर दिसत नाहीं म्हणून तो नाहीं. हे लोक प्रत्यक्ष प्रमाणवादी आहेत. ते म्हणतात, ज्या गोष्टी आम्हाला दिसतात. त्यांनाच आम्ही खरें मानतों. हें मत फार पुरातन आहे. पौर्वात्य आणि पाश्चिमात्य दोन्हींहि भागांत हें मानलें जातें. चार्वाक याच मताचे पुरस्कर्ते आहेत.

यावत् जीवं सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिवेत् ।
भस्मिभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ।

पाश्चात्य देशांत सायरेनिक्स पंथाचे लोक या मताचे होते. बाह्य ज्ञानेन्द्रियांना भासणारे तेवढेच विषय हे लोक मानतात.

पण वरील विधान खोटें कसें आहे हें सिद्ध करितां येतें कारण त्यांचें म्हणणें खरें मानलें तर विचार अस्तित्वांत आहे असें मानतां येणार नाहीं. तो बाह्य ज्ञानेन्द्रियांना गम्य असा नाहीं. विचाराप्रमाणें सत्ता, नियम यांचेंहि अस्तित्व मान्य करितां येणार नाहीं. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. या वरील गोष्टी आपण मान्य करितों. पृथ्वीच्या पोटातून तृणांकुर उत्पन्न करणारी शक्ति आपल्याला दिसत नाहीं. शक्ति केव्हांच दिसत नसते पण म्हणून ती नाहीं असें म्हणणें वेडेपणाचें ठरेल. ईश्वर ही एक व्यक्ति नसल्यामुळें ती दाखवितां येणार नाहीं. पण म्हणून ईश्वर नाहीं असें केव्हांच म्हणतां येणार नाहीं.

(२) सृष्टीला कर्ता पाहिजे असें म्हटल्यास ईश्वरालाहि कर्ता असलाच पाहिजे. पण अशी कर्त्याची मालिका सुरू केली तर ती कधीच संपायची नाहीं. त्यापेक्षां सृष्टीला कर्ताच नाहीं असें म्हणणेंच सयुक्तिक ठरेल.

हें प्रमाण सुद्धां खोडतां येतें. पंच महाभूतांचें अस्तित्व सर्वच मान्य करितात. तीं जड आहेत








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्याअर्थी त्यांना निर्माण करणारा कुणीतरी असलाच पाहिजे. त्याशिवाय ही निर्मिति शक्यच नाहीं. तो परमेश्वर सामर्थ्यवान असला तर त्याला दुसरा निर्माता मानण्याची आवश्यकता नाहीं. तो स्वयंतंत्र व स्वतःला उत्पन्न करणारा असाच असेल.

(३) हा ईश्वर असला तरी सकल गुणांनीं युक्त, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान असा (ईश्वर) जगताचें कारण मानणें अयुक्त आहे. कारण जग हें दुःखानें भरलेलें आहे. म्हणजेच तें वाईट व अपूर्ण आहे. म्हणून त्याचा शास्ता किंवा कर्ता सर्वज्ञ व सुंदर असेल हें संभवत नाहीं. तसेंच मानवी जीवन हें आधि, व्याधी यांनीं भरलेल आहे. म्हणून ईश्वर दुष्ट आहे असें वाटतें. किंवा सुष्ट असला तर मग तो दुर्बल असल्यामुळें आपला हेतु पूर्ण करूं शकत नाहीं.

या आक्षेपाला उत्तर :— आक्षेपक म्हणतात एवढें दुःख जगतांत नाहीं. तसें असतें तर सर्वांनीं आत्महत्त्या केली असती. शिवाय ते म्हणतात त्याप्रमाणें दुःखाची कल्पना पूर्णपणें निरपेक्ष नाहीं. मरणाचें दुःख नसतें तर कलेची वाढ झाली नसती. कारण वृद्ध सुधारणेच्या विरोधांत उभे असतात. तसेंच मरणच नसतें तर जगतांत लोकसंख्येची फार मोठी आपत्ती उद्‌भवली असती. मरणसुद्धां सर्वस्वी वाईट नाहीं.

(४) ईश्वर जर सर्वशक्तिमान व दयाळु असता तर त्यानें मानव तसाच निर्माण केला असता. परंतु वस्तुस्थिति उलट आहे. मनुष्य पूर्ण बनूं शकत नाहीं व क्रूरपणाचीं कितीतरी उदाहरणें आपण सदैव पहात असतों. यावरून परमेश्वर पूर्ण व दयाळु असें संभवनीय वाटत नाहीं.

उत्तरः— मनुष्यास परमेश्वरानें पूर्ण बनविलें असतें तर अपूर्णांतून पूर्ण बनविण्याचा आनंद त्याला उपभोगतां आला नसता. यशापयश आणि चढाओढी निर्माण झाल्याच नसत्या व जीवनांत उत्साहाचें स्थान राहिलें नसतें. शिवाय दुःख आहे म्हणूनच सुखास शोभा आहे. सदैव सावलींत रहाणाऱ्याला तिची किंमत वाटत नाहीं.

(५) आस्तिक लोक परमेश्वराचें अस्तित्व जगताचें कारण म्हणून व रचनाबद्ध व व्यवस्थित कार्याचा कर्ता म्हणून मानतात. पण निरीश्वरवादी म्हणतात कीं जगतांत ईश्वरवादी लोकांच्या म्हणण्याप्रमाणें इतकें रचनाकौशल्य दिसत नाहीं. मानवी शरीर त्याच्या कौशल्याचें उदाहरण म्हणून घेतलें तरी त्यांत सुद्धां दोष दिसतात. निरनिराळ्या रोगांना व विकारांना प्रतिकार करण्याचें सामर्थ्य त्यांत नाहीं. तात्पर्य : आपल्याला दिसणाऱ्या रचनेवरून कुशल, सर्वज्ञ ईश्वराचें अस्तित्व सिद्ध होत नाहीं.

वरील आक्षेप रचना-चातुर्याच्या बाबतींत आहे. हा आक्षेप विकासवादी व विज्ञानवादी यांचा आहे. पूर्वी विकासाच्या कल्पनेनें सर्व कोडीं उलगडतात, असें त्यांचें मत होतें. पण आतां त्यांना सुद्धां जगताच्या कर्त्याबद्दल उत्सुकता वाटूं लागली. व आवश्यकता भासूं लागली.

(६) ईश्वराच्या ठिकाणीं समता नाहीं. तसें असतें तर त्यानें सर्वांनाच सारखें सुखी व दुःखी ठेविलें असतें. तसेंच तो निर्घृण आहे. वृद्ध मातापित्यांपासून त्यांचे आधार असे पुत्र ओढून नेतो.

हा आक्षेप प्रथमदर्शनी खरा वाटतो, पण त्यांत तथ्य नाहीं. देव हा कर्माध्यक्ष आहे. प्रत्येकाच्या कर्मानुसार तो फळ देत असतो. देव दुःख सुख कुणाला स्वतः निर्माण करून देत नाहीं. प्रत्येकाच्या कर्माने प्रत्येकजण घेत असतो.

याप्रमाणें निरीश्वरवादी लोकांचीं काय मतें आहेत हें आपण पाहिलें. व त्यांच्या आक्षेपवजा प्रमाणांना योग्य उत्तरें दिलीं आहेत.

आस्तिक व नास्तिक यांची निरनिराळीं मतें बघितल्यावर खरोखर परमेश्वर आहे काय व असला तर तो कोणत्या स्वरूपाचा आहे, हे पाहूं. नास्तिक-






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वाद्यांच्या आक्षेपांना दिलेल्या उत्तरांवरून परमेश्वराबद्दल कल्पना येते.

**निष्कर्ष**

जड हें क्रियाशून्य आहे. मानव क्रिया करूं शकतो. जड पदार्थाच्या सहाय्यानें कांहीं निर्मिति करूं शकतो. परंतु शुद्ध निर्मिति करण्याचें सामर्थ्य त्याला नाहीं. बी असेल, तर ती पेरून त्याचें रोपटें झाल्यानंतर त्या रोपट्याचा फारतर महावृक्ष करूं शकेल. तो सुद्धां शक्तीच्या सहाय्यानेंच. पण बी तयार करूं शकणार नाहीं. ही शक्ति त्याला नाहीं. परंतु बी तर अस्तित्वांत आहे, त्याअर्थी ती कोणत्या तरी शक्तीनेंच केली आहे. याप्रमाणें ईश्वर ही एक कारणरूप घटना आहे; हें जगत्‌रूपी कार्यावरून दिसून येतें. सूर्याभोवतीं ग्रहास गरगर फिरविणारी, पृथ्वीवर जमीन व पाणी यांची घडामोड करणारी व न दिसणाऱ्या पेशींतून विभूति निर्माण करणारी अलौकिक शक्ति सृष्टींत आहे असें मान्य केलें तर ती शक्ति म्हणजेच ईश्वर होय.

ही परमेश्वरी शक्ति कशा स्वरूपाची आहे ? घट आहे, म्हणजे ती निर्मिति आहे. त्यासाठीं कर्ता असणें आवश्यक आहे. तो कर्ता म्हणजेच कुंभार होय हें आपण अनुभवानें जाणतो. मग ईश्वर हा घटाच्या कर्त्याप्रमाणें जगताचा कर्ता आहे– काय, हा प्रश्न आहे. उत्तर देतांना तो अशा स्वरूपाचा नाहीं असें सांगावें लागतें. कारण एकदां घटपटादींची निर्मिति केली म्हणजे कुंभार व विणकर यांचा त्यांच्याशीं कांहींहि संबंध राहात नाहीं. ते त्यापासून पूर्णपणें वेगळे असतात. ईश्वराचें तसें नाहीं. एकदां जगत् निर्माण करून तो त्यापासून अलग राहूं शकत नाहीं. जगतांत त्याच्या अनंत शक्तीचे अंश वास करीत असतात. असें जर नसतें तर एकदां घट बनविल्यानंतर त्यांत वाढ करणें किंवा घट करणें, हें जसें कुंभाराच्या शक्तीबाहेरचें आहे तसें त्याला अशक्य झालें असतें. वनस्पति, पशु, पक्षी, मानव हीं निर्माण केल्यानंतर क्रमानें त्यांत वाढ होत असते. व पुन्हां त्यांचा क्षय होतो. अंत होतो. म्हणून परमेश्वर चराचराला व्यापून उरणारा असा आहे. असें मानावें लागतें. परमेश्वर दगडांत आहे काय याचें उत्तर दुहेरी देतां येतें. जो मनुष्य मूर्तीला केवळ दगडच मानतो त्याला त्या ठिकाणीं परमेश्वर दिसणार नाहीं. पण जो मनुष्य फोटोला ज्याप्रमाणें प्रतिमा समजतात. त्याप्रमाणें मूर्तीला देवाच्या कल्पनेवरून भक्तीस साधनीभूत होणारी प्रतिमा मानतो. त्या मूर्तिला देवत्वाच्या शक्तीची कल्पना करतो. त्या ठिकाणीं तन-मन-धन अर्पण करून एकतानतेनें तिची भक्ति करतो. त्याला तेथें देवत्वाचा साक्षात्कार होतो. त्या मनुष्याचे दृष्टीनें तेथें ईश्वराची शक्ति आहे असें मानावें लागतें.

निरीश्वरवादी लोकांनीं आक्षेप घेऊन असें म्हटलें होतें कीं, आपल्याला ईश्वराचा अनुभव येत नाहीं. पण सर्वसामान्य जनांच्या बाबतींत जरी हें पूर्ण सत्य असलें तरी ज्या थोर मोठमोठ्या महात्म्यांनीं परमेश्वराच्या भक्तीसाठींच केवळ आपलें आयुष्य सदाचरण करून व्यतित केलें व सर्व चराचरांत त्याचें अस्तित्व मानलें, त्यांना त्याचा प्रत्यक्ष अनुभव आला असें त्यांनीं सांगितलें आहे. थोर लोक अनुभव येतांच तो अनुभव आला असें खोटे सांगतील हें त्यांच्या एकूण व्यक्तित्वाचा विचार करतां अशक्य आहे. त्यांना तसें सांगण्यांत कांहींच लाभ नाहीं. पूर्वीच्या काळचीं उदाहरणें सोडून दिलीं व आतां हल्लींच्या काळाकडे पाहिलें तरी रामकृष्ण परमहंसांना त्या शक्तीचा साक्षात्कार देवीच्या रूपांत झाला. ते त्या शक्तीशीं प्रत्यक्ष संभाषण करीत असत. हें उदाहरण आजकालचेंच आहें असें म्हणणें वावगें ठरणार नाहीं.

या वरील सर्व उदाहरणांवरून सिद्ध होतें कीं परमेश्वर ही एक कारणरूप शक्ति आहे. ती जग-







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तांचें कारण म्हणून आहे. जगतांत तिचे अंश वास करीत असून ती शक्ति जगताला व्यापून उरणारी अशी आहे. ईश्वर सर्वशक्तिमान व सर्वज्ञ आहे; म्हणून त्याला दुसऱ्या निर्मात्याची गरज नाहीं. तो स्वतःच स्वतःला निर्माण करूं शकतो. त्यामुळे त्याला कर्ता कोण असें विचारण्याची आवश्यकता नाहीं आगगाडीला अनेक डबे असतात. एक दुसऱ्याला ओढतो, दुसरा तिसऱ्याला ओढतो, अशी साखळी चालू होते. पण एन्जीन हें सर्व डब्यांना ओढतें. त्याला ओढणारें कुणींच नसतें. त्याचप्रमाणें जगताच्या आगगाडीला ओढणारा ईश्वर आहे, पण त्याला ओढणारा मात्र कुणीं नाहीं.

ईश्वरी शक्ति ही एक आंतरिक शक्ति आहे. मुकुलित कळ्यांना पाकळ्या बाहेरून चिकटविल्या जात नाहींत. आंतील शक्तीनें कळी फुलत असते, विकसीत होत असते. ईश्वर, शक्तीला बाहेरून नटविणारा नसून आंतून सुशोभित करणारा आहे. जमिनींतून झरा बाहेर पडतो, तद्वत समृद्धीची आकाशगंगा ईश्वराच्या अंगांतून बाहेर पडते. ईश्वराच्या एकविश्व शक्तींतून अनेकविश्व जीव, वनस्पति निर्माण होतात. पृथ्वीवरील २-२॥ कोटी मानवांत मानवता एकच असून एक मनुष्य पूर्णपणें दुसऱ्यासारखा नाहीं. अशी सृष्टीला आंतून उत्तेजन देऊन फुलविणारी, एकविश्वतेंतून अनेकविश्वता निर्माण करणारी परमेश्वरी शक्ति अधिष्ठान रूपानें या जगताचें कारण म्हणून वास करीत आहे हें मान्य करावें लागतें.


प्राज्ञ पाठशाळा मण्डळ–ग्रन्थ प्रकाशन

**वैदिक संस्कृतीचा विकास**

लेखक– **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी,**

वैदिक संस्कृतीचें विकसित रूप म्हणजेच आजची भारतीय संस्कृति होय. भारतीय संस्कृतीच्या जन्मापासून आतांपर्यंत झालेल्या स्वरूपाचें वर्णन या पुस्तकांत प्राधान्यानें केलें आहे. वैदिक संस्कृतीच्या अभ्यासकास अत्यंत उपयोगी आणि मराठी भाषेंताल अत्यंत अप्रतिम अशा प्रकारचें हें पुस्तक आहे.

**किंमत ६ रु.**

प्रकाशक

**व्यवस्थापक प्राज्ञपाठशाळामंडळ**

**वाई ( जि० उ. सातारा )**







अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## वाचकांचा पत्रव्यवहार–

संपादक,

'नवभारत' यांस

गेल्या कांहीं अंकांत श्री. प्र. रा. देशमुख सिंधुसंस्कृतीबद्दल लिहीत आहेत. "वैदिक आर्यांचे शत्रू" सिंधुसंस्कृतींतले लोक होत असें गृहीत धरूनच त्यांनीं हें संशोधन चालविलेलें दिसतें. वेद-वाङ्मयाचा त्यांचा व्यासंग गाढा दिसतो. परंतु संशोधन करतांना त्यांनीं एकाच तर्कावर इतका भर कां द्यावा आणि जें सिद्ध करावयाचें आहे. तें इतक्या आवेशानें; इतक्या विश्वासानें गृहीत कां धरावें तें कळत नाहीं. म्हणून हें पत्र जिज्ञासू वृत्तीनें लिहिलें आहे.

आर्यांचा आणि सिंधू संस्कृतींतल्या लोकांचा झगडा होण्याचें कारण श्री. देशमुख यांनीं स्पष्ट सांगितलें नाहीं. शिवाय आर्य जर भ्रमंती करणारे, पशुपालन संस्कृतींत तेव्हां होते, तर "पुर" वासी सिंधुजनांनीं आर्यांना जिंकण्याऐवजीं आर्यांनी "पुरें" फोडलीं – आर्यांचा 'पुरंदर' शक्र वारंवार विजयी कां झाला ? या प्रश्नाचें उत्तर मिळालें पाहिजे. शिवाय असें पहा कीं, ज्यांना "पुरें" वसवितां येत नव्हतीं, त्याना तीं फोडण्यासाठीं लागणारीं शस्त्रें कशीं उपलब्ध झालीं ? पुरें फोडण्याचें प्रयोजनही कळलें पाहिजे. मुसलमानांना "मूर्ति" मान्य नव्हत्या; मूर्तिपूजेला त्या धर्मात बंदी होती. म्हणून मुसलमानांनीं आमच्या अनेक मूर्ति छिन्नविच्छिन्न केल्या, हें सयुक्तिक वाटतें. तसें आर्यांचें सिंधु संस्कृतीच्या लोकांशीं वर्तन सयुक्तिक, सकारण वाटत नाहीं

पणींचा आणि आर्यांचा झगडा सांगितला आहे. त्याबाबतहि असेंच म्हणावयाचें आहे. त्यांच्या गायी म्हणे आर्यांनीं लूटमारीनें वळवून नेण्यास सुरवात केली ! पणींजवळ गोधन होतें आणि आर्यांना तें हवें होतें असें मानलें तरी लुटालूट, मारामारी, एवढाच मार्ग आर्यांनीं अवलंबिला कीं काय ? आर्यांची एक पद्धत "कल्पनातीत मोठीं" गोदानें देण्याची देशमुखांनीं सांगितली आहे. पणींनींही तशीं गोदानें आर्यांना कां दिलीं नाहींत ? आर्य तेवढे सद्गुणसंपन्न आणि "पणी" मात्र कलहप्रिय असें प्रथमपासूनच समजण्यांत कांहीं तरी चुकत आहे असें वाटतें. पूर्वीचा समाज एवढ्या तेवढ्या वरून भांडत असे असें मानलें तरी टोळ्यांच्या वर्तनाचा विचार अधिक व्यवहारी. अधिक सयुक्तिक पद्धतीनें व्हावा हीच अपेक्षा.

आणखीही एक सूचना : आशियामायनरमध्यें "बोगझ कुई" जवळ कांहीं इष्टिका सापडल्या (स. १९१० च्या सुमारास) त्यांवर "इंद्र, वरुण, नासत्य" अशीं वैदिक देवतांचीं नांवें होतीं. त्या इष्टिकांचा काल ख्रिस्तपूर्व १२००–१३०० वर्षें मानतात. तेव्हां आर्यांचा तेथें कांहीं तरी संबंध असावा असा तर्क श्री. देशमुखांना सुचला नाहीं का ? तेथें आर्यांचें वास्तव्य असावें आणि आतां त्याचें नांवनिशाणही उरलें नाहीं, तेव्हां झगडे, लढाया, भांडणें कांहीं झालीं असतील तर त्या प्रदेशांतहि चौकशी करणें आवश्यक आहे कीं नाहीं ?

अलीकडील संशोधनांत "हिट्टाइट" संस्कृतीचा शोध लागला आहे. त्याची पुसट ओळख जरी असती तरी आर्यांशीं झालेल्या झगड्यांची भूमी हिंदुस्थानापासून दूर प्रदेशांतही असावी असा तर्क सुचला असता. आणि अधिक व्यापक संशोधनाची आवश्यकता पटली असती. श्री. देशमुखांचेंच म्हणणें कदाचित् खरें असावें. परंतु तें मान्य होण्यासाठीं.

१ झगड्याचीं कारणें;

२ इतर कुठें तसे झगडे झाले कीं नाहीं यांचा तपास;



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

३ पुरें फोडण्याचीं साधनें आर्यांना उपलब्ध होतीं–पण त्यांना स्वतःसाठीं पुरें बांधतां येत नव्हतीं.

इत्यादि बाबींसंबंधीं साधार पुरावा मिळविला पाहिजे "पणी" सिंधु संस्कृतींत वावरत होते. हे कुठें सिद्ध झालें आहे काय? एक तर्क असा कीं, हल्लींचें लेबनान म्हणून जें राष्ट्र आहे, तें पणींचें आहे काय?

शेवटीं श्री. देशमुखांना एक नम्र विनंती करावयाची आहे. संशोधनांतील अनुमानें आणि सर्वमान्य सिद्धान्त यांतील भेद ओळखावा आणि त्यांप्रमाणें आपलीं विधानें अनुमानात्मक असावीं! ठाम सिद्धान्तपर मांडण्याचा आवेश त्यांत नसावा. हें सुचविण्याचें औधत्य केल्याबद्दल क्षमस्व.

सारस्वत बँक बिल्डिंग, मुंबई ४. दि. ८-३-५९ } श्री. रा. टिकेकर

**साभार पोंच –**

१. वास्तु –– वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे; इंदिरा प्रकाशन, नागपूर. किं. ३ रु.

२. आवडनिवड — प्रा. स. गं. मालशे, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; किं. ५ रु.

३. मर्ढेकरांची कविता — बा. सी. मर्ढेकर; मौज प्रकाशन, मुंबई ४; किं. ५ रु.

४. केन्स आणि शुम्पिटर यांचें अर्थशास्त्र– सी. पं. खेर, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; किं. ४ रु.

५. साहित्य –– मुंबई मराठी साहित्य संघाचें वार्षिक, १९५७, किं. ३ रु.

**चुकीची दुरुस्ती —**

नवभारत मासिकाच्या मार्च १९५९ च्या अंकांत पृ. ४० समोर छापलेल्या मूर्तीबाबत "रामटेकच्या मूर्ती" असा मथळा देण्यांत आला आह. तो चुकीचा असून त्या ऐवजीं "रामगडच्या मूर्ती" असें वाचावें. प्रस्तुत चूक नजरेस आणून दिल्याबद्दल प्रा. म. म. वा. वि. मिराशी यांचे आम्ही आभारी आहोत.

––का० सं०


**चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान**

– लेखक –

प्रा. सदाशिव आठवले

किं. रु. ३

मिळण्याचें ठिकाण ––

चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई.

[ जि. उ० सातारा ]




अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | किंमत |
|---|---|---|
| (१) | धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ६४–०–० |
| (२) | धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १२६–०–० |
| (३) | मीमांसादर्शन ... ... ... ... | ३०–०–० |
| (४) | मीमांसाकोश ... भाग १ ते ४ | १३५–०–० |
| (५) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | ६–०–० |
| (६) | हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) ... | ५–०–० |
| (७) | वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | ६–०–० |
| (८) | नवमानवतावाद ... ... ... ... | २–८–० |
| (९) | मानवाचा आदर्श ... ... ... ... | ३–०–० |
| (१०) | चार्वाक – इतिहास आणि तत्त्वज्ञान | |
| | (प्रा. सदाशिव आठवले) ... ... | ३–०–० |
| (११) | प्राचीन भारतीयांची राज्यमीमांसा | |
| | (तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी) ... ... | छापत आहे |

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

